प्रधान मि. चर्चिल यांनीं ही मागणी हास्यास्पद ठरविली ! खुद्द कॅनडाची ही स्थिति असल्यामुळें हिंदुस्थानांत गोद्या बांधून इकडे जहाजें तयार करूं लागावें व नौकारचनेच्या या जुन्या विद्येस फिरून चालन द्यावें असें सरकारच्या मनांत येणें शक्यच दिसत नाहीं. अशा स्थितींत प्रो. मुकजीर यांच्या पुस्तकानें झालें तरी कोणती कामगिरी साधणार, असें कोणासहि वाटण्याचा संभव आहे. ठीकच आहे. कारण या बाबतींत इतिहास-संशोधनाच्या हजारों पुराव्यांचे कागद एकत्र शिवले तरी मासे मारणाऱ्या कोळ्याची एकादी यःकश्चित् होडीहि त्यापासून तयार होणार नाहीं ! तरी पण नाविक विद्येबरोबर त्या विद्येची आमची कोरडी आठवणहि जी वठत चालली होती, ती प्रो० मुकरजी यांनीं ताजी टवटवीत केली. हा झाला तरी त्यांचा उपकार कांहीं लहान आहे असें म्हणतां येत नाहीं.

---

लेख दहावा

# झांशीच्या महाराणी श्री० लक्ष्मीबाईसाहेब यांची पुण्यतिथि

"झांशीच्या महाराणी श्री० लक्ष्मीबाईसाहेब यांच्या स्मरणाचा दिवस पाळण्याचा हा उपक्रम नवाच. तथापि असले उत्सव झालेले बरे. वर्षाच्या पंचांगांत सगळे अशा प्रकारचे दिवस नोंदले जावेत. यांतील कांहीं दिवस कोणी धार्मिक दृष्टीनें पाळतील, कांहीं दिवस राष्ट्रीय दृष्टीनें पाळतील. रोजनिशींत प्रत्येक पानावर संस्मरणीय वाक्यें दिलेलीं असतात, त्यांचा उपयोग काय ? तर तें वाक्य वाचलें तर तितकाच वेळ त्याच्या चिंतनांत जातो. राणीसाहेबांची पुण्यतिथि पाळण्याचे बाबतींत कांहीं सुज्ञ माणसांच्या मनामध्यें गैरसमज आहे. इतिहासाचे प्रेमी व अनुभवी असे एक गृहस्थ

आज मला म्हणाले कीं, 'लक्ष्मीबाईची पुण्यतिथि पाळणें बरोबर नाहीं. मी या सभेला हजर राहात नाहीं.' लक्ष्मीबाईसाहेबांनीं एवढें घोडें काय मारलें ? मेलेल्या स्त्रीच्या उज्ज्वल चारित्र्याची आठवण करणें यांत गैर काय आहे ? ही सरळ गोष्ट आहे. त्या बंडांत सामील झाल्या एवढाच त्यांच्या बाबतींत दोष दाखविण्यांत येतो. त्या बंडांत सामील झाल्यावर त्यांचा ज्या रीतीनें शेवट व्हावयाचा तो झाला. आज आपण जो उत्सव करीत आहों तो त्या बंडांत सामील झाल्या याकरितां नसून, त्यांच्यांत जे उदात्त गुण दिसून आले त्यांची आठवण म्हणून हा उत्सव करीत आहोंत. यांत वर्तमान राजकारण नाहीं व गतकालचेंहि राजकारण नाहीं. लास्ट म्यूटिनी हिरो म्हणून एकाद्या फाटक्या तुटक्या शिपायाची नोंद तिकडे करण्यांत येते, त्या वेळीं बंडांत सामील असलेला इतकाच त्या हीरोचा अर्थ. बंडाची इतकी आठवण विलायतेंत ठेवण्यांत येते. मग भारतीय योद्धयाच्या तोडीचे पराक्रम ज्या तेजस्वी स्त्रीनें केले, तिची आठवण ठेवणें यांत गैर काय आहे ? यांत राजकारण नाहीं. बंड करा असें कोणी सांगत नाहीं. शिवाय आपण जर इतिहास चाळला, तर असें दिसून येईल कीं, ज्या राजकीय दृष्टीनें बंडाला बंड म्हणतों त्या दृष्टीनें लक्ष्मीबाईसाहेबांनीं बंड केलें नव्हतें. इंग्रज सरकारला येथून घालवून द्यावें असा त्यांचा हेतु नव्हता; तर त्यांची सरकारविरुद्ध तक्रार होती. लक्ष्मीबाईला शेवटीं सरकारकडून जी वागणूक मिळाली, त्यामुळें त्या बेफाम झाल्या व शेवटीं नाइलाजानें बंडांत सामील झाल्या. नानासाहेब बंडवाले म्हणून प्रसिद्ध आहेत. पण खरा इतिहास तसा नाहीं. इंग्रजी अधिकाऱ्यांची खुषामत करणारे, त्यांना मेजवान्या देणारे सरदार अशी त्यांची प्रसिद्धि होती. या सगळ्याचा हेतु बाजीरावसाहेब मेल्यावर जें पेन्शन बंद झालें तें परत मिळावें असा स्वार्थी होता. मी आपणाला हा जो नवा वृत्तांत सांगत आहें हा मीं ब्रह्मावर्ताला ऐकला आहे. समकालीन लोकांनीं लिहिलेला किंवा सांगितलेला तोच खरा इतिहास. मी १९१६ सालीं ब्रह्मावर्ताला गेलों होतों. बाजीरावाच्या हाताखालीं सरदार असलेले धारवाडचे सुभेदार घराण्यांपैकीं एक वृद्ध गृहस्थ मला भेटले. ते बंडाचे वेळीं हजर होते. त्या गृहस्थांनीं अशी हकीकत सांगितली कीं, इंग्रज या देशांतून जावे म्हणून

हें बंड केलें नाहीं, तर इंग्रजांच्या अन्यायाविरुद्ध बंड केलें होतें. नानासाहेबांचे चुलत भाऊ रावसाहेब हे जहाल असून हिंमतवान् व शूर होते. बेटामध्यें शिकार वगैरे करण्याच्या नादांत ते असत. तोंडांत पट्टा धरून भरलेल्या नदींतून पोहत जाऊन पैलतीर गांठावयाचा व शिकार करावयाची हा त्यांचा व्यवसाय होता. चोहोंकडे बंड झालें. कानपुरास साहेबांची कत्तल झाली. हिंदु-मुसलमान हे दोघेहि त्या वेळीं बंडांत सामील होते. हिंदु-मुसलमानांची त्या वेळीं आटोकाट एकी होती. पण बंड फसलें. दिल्लीच्या बादशहाला आपला राजा करावयाचा असें बंडवाल्यांनीं ठरविलें व ते दिल्लीच्या मार्गानें निघाले. ब्रह्मावर्त टाकून ते एक मुक्काम पुढेंहि गेले; पण लोक उतावळे झाले होते. दिल्ली तर दूर होती. तेव्हां ते जवळपास राजा शोधूं लागले तेव्हां पेशव्यांचा वंशज असल्याचें त्यांना कळलें व ते बंडवाले एक मुक्काम पुढें गेलेले परत ब्रह्मावर्ताला आले. त्या म्हाताऱ्या गृहस्थानें मला जी हकीकत सांगितली ती अशी :—संध्याकाळीं पांच वाजतां ते बंडवाले ब्रह्मावर्तास आले. त्या वेळीं नदीच्या कांठीं रावसाहेब, नानासाहेब वगैरे मंडळी बसली होती. ते बंडवाले नानासाहेबांना म्हणाले कीं, ‘ आपण आमचे राजे व्हा ’ त्या वेळीं नानासाहेबांनीं ‘ मी होणार नाहीं ’ असें उत्तर दिलें. तेव्हां बंडवाल्यांनीं सांगितलें कीं, या बंडांत सामील तरी व्हा, नाहीं तर आपल्याला इथल्या इथें तोडूं. रावसाहेबांनींहि नानासाहेबांना भर दिली. बंडवाल्यांचा एकच सवाल कीं, आमचे पुढारी व्हा नाहीं तर मरा ! अशा स्थितींत नानासाहेबांना त्यांत सामील व्हावें लागलें. याच्यापूर्वींच कानपुरला पहिली कत्तल झाली होती. त्यानंतर दुसरी झाली. आपलीं बायकामुलें नावेंत बसवून न्या असें साहेबांना नानांनीं सांगितलें. त्याप्रमाणें गंगेंतून नावा चालल्या. बंडवाले यांची कत्तल करा म्हणत होते; पण नानासाहेबांनीं खूप विरोध केला. शेवटीं बंडवाल्यांनीं त्यांचें ऐकलें नाहीं. त्यांनीं तोफ डागून नाव बुडविली व शेवटीं या सर्वांचें खापर नानांच्या माथीं फुटलें. पुढें तेथून नानासाहेब पळाले ते ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत राहिले व अखेर ते नेपाळमध्यें गेले. पुढें त्यांचें काय झालें हें सांगतां येत नाहीं. या सर्वांवरून आपल्या ध्यानांत येईल कीं, त्या वेळीं जें बंड झालें तें अन्यायाविरुद्ध झालें व त्यांना नाइलाजानें बंडांत सामील व्हावें लागलें. लक्ष्मी-

वाई बंडांत सामील झाल्या तरी त्यांत राज्यक्रांति नव्हती. त्यांचे जे अलौकिक गुण आहेत, त्यांची मोकळ्या मनानें आठवण करण्यास कांहींहि हरकत नाहीं. यांत सरकारचा गुन्हा नाहीं. कोणतेंहि पाप नाहीं. आपल्यांतील चांगली स्त्री भारतीय योद्धयाप्रमाणें लढली, किल्ला जातीनें लढविला, अशा तेजस्वी स्त्रीचें गुणवर्णन करणें जरूर आहे. ही एवढी हकीकत सांगण्याचें कारण कांहीं सुज्ञ माणसांना अजूनहि या बाबतींत शंका येते. म्हणून हा वृत्तांत सांगितला."

---

लेख अकरावा

# पानिपतचे धर्मवीर

[ उपव्याख्यान ]

आजचे व्याख्याते रा. पेंडसे यांनीं पानिपतचें जें वर्णन केलें आहे तें मन तल्लीन करून सोडणारें होतें. मी प्रत्यक्ष पानिपतचें रणमैदान दिल्ली वगैरे प्रदेश या दृष्टीनें स्वतः हिंडून पाहून आलों असल्याकारणानें व्याख्याते युद्धाचें वर्णन करीत असतां माझ्या डोळ्यांसमोर त्या प्रसंगाचें एक मोठें चित्रच उभें राहिलें होतें. अंगीकृत कार्याकरितां मराठे वीरांनीं धारातीर्थीं देह ठेविले. या दृष्टीनें आजच्या दिवशीं या प्रसंगाचें स्मरण करणें युक्त आहे. जय किंवा पराजय या एकाच दृष्टीनें पानिपतच्या प्रसंगाकडे पाहणें योग्य किंवा न्याय्य होणार नाहीं.

महंमदअल्लींचें उदाहरण घेऊन मुसलमान लोक पानिपतची आठवण काढून हिंदूंना चिडवीत असतात असें जें व्याख्यात्यांनीं सांगितलें आहे तें कांहीं खोटें नाहीं. महंमदअल्लींकडून होणारी ही गोष्ट मीं स्वतः अनेक वेळां पाहिली आहे. वादाच्या भरांत ते आले कीं, नेहमीं मला म्हणतात ' Let us fight Panipat over again. ' परवां कानपुरास सरोजिनीबाईंच्या सन्माना-

करितां जावयास महंमदअल्ली व मी जोडीनें जात असतां कोणी एक जण म्हणाला, "हे पाहा मराठे व रोहिले एकत्र मिळून चालले आहेत." त्या वेळीं काय किंवा इतर वादाच्या वेळींहि महंमदअल्लींच्या तोंडीं जो शब्द येतो तो हा कीं, आपण पुन्हां एकदां पानिपत खेळूं."

पण यावर मीं त्यांना दोन उत्तरें दिलीं. मीं म्हटलें, "पानिपतची आठवण तुम्ही वारंवार काढतां. पानिपत कसें काय झालें हें आपणां दोघांनाहि कळतें ! पण पानिपत कशाकरितां झालें, तें तुम्हांस मान्य आहे काय ? परदेशीय मुसलमानांचा व आमचा संबंध नाहीं. हिंदुस्थानांत हिंदु व मुसलमान आम्ही एकमेकांचें पाहून घेऊं, याला तुम्ही तयार आहां काय ? परक्या अबदाल्लीनें दिल्लीवर स्वारी केली. त्याला शह बसावा म्हणून पानिपत झालें व इब्राहिम गारद्यासारख्या मुसलमानानेंहि त्या प्रसंगीं मराठ्यांना साह्य केलें. तेव्हां हिंदूंचा तुम्हीं पराजय केला यापेक्षां हिंदी मुसलमान विरुद्ध परके मुसलमान हा मुद्दा मुख्य आहे हें विसरून चालणार नाहीं. दुसरें कारण मीं त्यांना सांगितलें तें असें कीं, पानिपतास जें झालें तें आम्हीं पुढें चाळीस वर्षांत सव्याज भरून काढलें, त्याची वाट काय ? पानिपतच्या नंतर दहा वर्षांच्या आंतच मराठ्यांच्या पुन्हां दिल्लीकडे स्वाऱ्या होऊं लागल्या व पुन्हां त्यांनीं दिल्लीचा बादशहा आपल्या खांकोटीस मारला ! हंटर या इंग्रजी इतिहासकारानेंच असें लिहून ठेविलें आहे कीं, १८०३ सालीं आम्हीं राज्य जिंकलें तें मोगलांकडून नव्हे तर मराठ्यांच्याकडून ! पानिपतनंतर मुसलमानांचें काय राहिलें ? पानिपतनंतर अबदालीची तर इतकी दुर्दशा झाली कीं, त्यानें पुन्हां दिल्लीचें तोंडहि पाहिलें नाहीं ! दिल्लीचें राजकारण शेवटीं व शेवटपर्यंत मराठ्यांनींच आपल्या मुठींत ठेविलें.

महंमदअल्लींसारख्या विद्वेषी प्रतिस्पर्ध्यांना अशीं प्रत्युत्तरें वेळोवेळीं देऊन गप्प बसविलें पाहिजे. असहकारितेच्या भरांतसुद्धां या सुशिक्षित म्हणविणाऱ्या पुढाऱ्यांची अशी भावना कीं, केमालपाशा इंग्रजांच्या हातून हिंदुस्थानास स्वराज्य मिळवून देणार आणि एकादा धर्माचा अवतार नवीन उत्पन्न होतो त्याचप्रमाणें म्हणे आम्हीं त्याच्या आगमनाची तयारी करावी म्हणून हे आम्हांस सांगतात ! हिंदुमुसलमानांच्या तंट्यांतली खरी दृष्टि काय आहे ती लक्षांत घ्या. मुसलमान झाला तरी तो सरहद्दीच्या आंतला आहे

कीं बाहेरचा आहे, ही दृष्टि ठेवून शंभर वर्षांपूर्वीचें राजकारण चाललें होतें. दिल्लीच्या राजकारणाची वांटणी हिंदुस्थानांतले हिंदुमुसलमान आम्ही काय वाटेल ती पाहून घेऊं. परक्या हिंदुस्थानबाहेरच्या माणसाला त्यांत ल घालूं देणार नाहीं, ही दृष्टि तुम्हांस मान्य आहे काय ?

पण राजकारणांतली ही दृष्टि नसलेले मोठे लोकसुद्धां भोळसटपणानें कशा घोडचुका करतात त्यांचें विषयांतूनच विषय निघाला म्हणून एक उदाहरण सांगतों. तुम्हांलासुद्धां ऐकून इतक्या भोळ्या स्वभावाचा अचंबा व चमत्कार वाटेल. दोन वर्षांपूर्वी अफगाणिस्थानचे परराष्ट्रीय वकील हिंदुस्थानांत आले असतां महंमदअल्लींच्यातर्फे हिंदी पुढाऱ्यांची भेट घेण्याची त्यांनीं इच्छा दर्शविली, त्याप्रमाणें त्यांनीं आपल्याकडेच आम्हांला चहाचें आमंत्रण दिलें. त्या प्रसंगीं महंमदअल्ली, मी, नेहरू वगैरे बरीच मंडळी असून राजगोपाळाचार्यहि हजर होते. समारंभ आटोपल्यानंतर वकील-साहेबांनीं बोलून दाखविलें कीं, " आमच्या राजेसाहेबांनीं अशी सदिच्छा दर्शविली आहे कीं, हिंदुस्थानास लवकरच स्वराज्य प्राप्त होवो !" ही दरबारी भाषा कोणास समजत नाहीं ? लगेच मोतीलाल नेहरू यांनीं उठून सांगितलें कीं, " आपण आपल्या राजेसाहेबांना कळवावें कीं, हिंदुस्थानास स्वराज्य मिळावें अशी सदिच्छा आपण दर्शविली हे आपले फार उपकार आहेत. " दरबारी भाषा व दरबारी उत्तर हीं बरोबर झालीं. पण यावर राजगोपाळाचार्यांना बोलण्याची हुक्की आली ! त्यांनीं वकिलांस सांगितलें, "कृपा करून आपल्या महाराजांस कळवा कीं, आमच्या देशास स्वराज्य मिळाल्यावर आपण हिंदुस्थानवर स्वारी करूं नये !"––(हंशाच हंशा) दुभाष्यानें वकिलांस राजगोपाळाचार्यांचें म्हणणें समजून सांगितलें, वकीलसाहेबहि हंसून म्हणाले, " अगदीं बरोबर. तुमची मागणी रास्त आहे. महाराजांना सांगून मी सरकारी गॅझेटांतच तसें प्रसिद्ध करवितों." स्वराज्य मिळाल्यावर हिंदुस्थानवर स्वारी करूं नका म्हणून हे वकिलाला सांगणार आणि अमीराच्या मनांत स्वारी करावयाचीच असल्यास राजगोपाळाचार्यांच्या सल्ल्यामुळें तो थांबणार ! आतां या भोळसटपणाला तुम्ही काय म्हणाल ? म्हणून मी पुन्हां म्हणतों कीं, या प्रश्नाकडे पाहण्याची दृष्टि समजली पाहिजे व ती दृष्टि हीच कीं, हिंदुस्थानांतले प्रश्न सोडवावयाचे असतील तर हिंदी

मुसलमानांनीं हिंदुस्थानाबाहेर मदत पाहूं नये. पण महंमदअल्ली एक डोळा आमच्यावर ठेवणार व एक बाहेर ठेवणार, यानें कसें बनणार? म्हणूनच मीं त्यांना विचारिलें, पानिपत ज्या कारणाकरितां झालें तें राजकारण तुम्हांस मान्य आहे काय?

व्याख्यात्यांनीं पानिपतास पडलेल्या वीरांना धर्मवीर असें म्हटलें. माझें म्हणणें इतकेंच कीं, धर्मवीर खरे पण त्यांचा धर्म कोणता? व्यक्तिधर्म कीं जातिधर्म? कर्तव्यकर्म करीत असतां त्यांनीं धारातीर्थीं देह ठेविले हा व्यक्तिधर्म होय, व तो त्यांनीं उत्तम रीतीनें पाळला. पण जातिधर्माचा म्हणजे हिंदुधर्माचा प्रश्न या ठिकाणीं होता असें दिसत नाहीं. दत्तोपंत आपटे यांनीं म्हटल्याप्रमाणें भाऊसाहेबांची दृष्टि धर्मावर नसून राजकारणावर होती. हिंदुधर्माकरितां मराठ्यांनीं पानिपत केलें हें म्हणणें इतिहासाला धरून नाहीं. शाहूपर्यंत दक्षिणेंत मुसलमानांचे हल्ले होत त्या वेळचीं युद्धें धर्माकरितां झालीं असें एक वेळ म्हणतां येईल. परंतु शाहूनंतर उत्तरेकडून दक्षिणेवर स्वारी झाली नाहीं. मग दक्षिणेकडून उत्तरेकडे उलट अहेर सुरू होऊन स्वाऱ्या होऊं लागल्या. पहिला पेशवा बाळाजी विश्वनाथ यानें दिल्लीस प्रथम जाऊन प्रथम चौथाईच्या सनदा आणल्या व बादशहाच्या नांवाखालीं आपला अंमल चालू केला. मुसलमानी पातशाही त्यांनीं नाकबूल केली नाहीं. इंग्रजांनीं बंगालच्या दिवाणीच्या बाबतींत जें केलें तेंच मराठ्यांनीं दिल्लीच्या राजकारणांत केलें. त्यांनीं तरी दुसरें काय केलें? बाळाजी विश्वनाथ व बाजीराव यांनीं जें दिल्लीच्या राजकारणांत केलें तेंच पुढें नानासाहेब यानें बरोबर चालविलें. दिल्लीवर आपला कबजा ठेवण्याकरितां मराठ्यांचा सर्व प्रयत्न होता; व परक्या अबदालीनें दिल्लीवर येऊन स्वारी केली म्हणून पानिपत झालें. दोन वर्षें उत्तर हिंदुस्थानांत कटकट चालू होती. त्याचा अखेर परिणाम पानिपतांत झाला.

धर्मवीर हें नांव न देण्याबद्दल माझें दुसरें कारण असें आहे कीं, गेल्या शंभर वर्षांच्या राजकारणांत मुसलमानांनीं आपल्या धर्माकडे ज्या दृष्टीनें पाहिलें तितक्या कडव्या दृष्टीनें आम्हीं आपल्या धर्माकडे केव्हांहि पाहिलें नाहीं. मराठ्यांचा हा गुण म्हणा, दोष म्हणा, ही गोष्ट कोणास अप्रिय वाटेल. पण अप्रिय वाटली तर यापुढें सुधारण्याचा प्रयत्न करा. पण

ऐतिहासिक सत्य हें अप्रिय असलें तरी जसेंच्या तसें स्पष्टपणें बोलून दाखविण्याची तयारी पाहिजे. इतिहास पाहिला तर मराठे हे धर्माला राजकारणापेक्षां प्राधान्य देतात असें दिसत नाहीं; राजकारणच मुख्य मानतात. आपलीं धर्मक्षेत्रें त्यांनीं मुसलमानांपासून प्रयत्न केला असता तर मिळणं कांहीं अशक्य नव्हतें. पण करतो कोण? जय झाला तर फार तर तहांत धर्मक्षेत्रें सोडविण्याचें कलम घालतील! पण पाश्चात्य राष्ट्रें सर्रहा धर्मयुद्धावर निघत त्याप्रमाणें मराठ्यांनीं काशीक्षेत्र सोडविण्याकरितां मोहीम केली असें झालें नाहीं. एकट्या नानासाहेबांनीं मात्र प्रयत्न केला. पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं, बनारसपासून चार मैलांच्या आंत मराठ्यांचें सैन्य आलें असें कळतांच गंगेवर ब्राह्मण उघडेबोडके स्नानसंध्या करीत होते, त्यांनीं तसेंच धांवत जाऊन विनंति केली कीं, काशीक्षेत्र काबीज करूं नये! तुम्ही परत गेल्यावर आमची गांठ मुसलमानांशीं आहे. अर्धें देऊळ अर्धी मशीद अशी स्थिति असली तरी "गंगेस स्नानसंध्येला पाणी उदंड आहे" ही त्या वेळची धार्मिक वृत्ति! तेराव्या शतकांत महमुदानें स्वारी केली तेव्हां त्याचा एक सरदार देवळें व मूर्ति फोडीत गेला तो केप कामोरीनच्या टोंकापर्यंत! व तो सर्व हिंदु लोकांच्या प्रांतांतून! मराठ्यांना धर्माचा अभिमान, तर त्या वेळीं एका तरी हिंदु राजाला धर्माची लाज असावयास पाहिजे होती. तेरावें शतक काय किंवा पुढें काय, हाच क्रम पुढेंहि दिसतो. म्हणून धर्मकारणापेक्षां राजकारणी स्वभावच मराठ्यांचा दिसतो. हा गुण म्हणा, दोष म्हणा; दोष वाटला तर काढून टाका. पण मराठे धर्माला राजकारणापेक्षां वरचें स्थान देत नसत, असें इतिहासावरून स्पष्ट दिसतें. ऐतिहासिक सत्य म्हणून तें आपणांस कबूल करणें भाग आहे. जातिधर्म म्हणजे हिंदुधर्म या दृष्टीनें पानिपतच्या वीरांना धर्मवीर असें म्हणावयाचें नसून, आपद्धर्माचे प्रसंगीं ब्राह्मणांनीं क्षत्रियधर्म देखील स्वीकारला, अंगीकृत कार्याची तड पोंचविण्यासाठीं मराठ्यांनीं धारातीर्थीं देह ठेविले, म्हणजे त्यांनीं व्यक्तिधर्म उत्तम रीतीनें पाळला म्हणूनच त्यांचें आज स्मरण करावयाचें आहे.

---

## लेख बारावा

# मुसलमानी पातशाहीचा ऱ्हास

[ केसरी, ता. १० ऑक्टोबर १९१३ ]

एकोणिसाव्या शतकांत इटलीच्या पुनरुज्जीवनास प्रारंभ झाल्यापासून इटॅलियन मुत्सद्यांनीं एक गुण विशेष दाखविला आहे. तो गुण धूर्तता हा होय. युरोपियन राजनीतीच्या इतिहासांत ज्याला शकुनी किंवा कणिक यांची उपमा साजेल असा मॅकिव्हेली हा होऊन गेला. सर्व युरोपियन लोकांत इटॅलियन लोक अधिक धूर्त व सर्व इटॅलियन लोकांत मॅकिव्हेली हा अधिक धूर्त असें मानण्यांत येतें. मॅकिव्हेलीयन राजनीतीचें मुख्य तत्त्व असें आहे कीं, वेळ पडेल त्याप्रमाणें वागावें व संधि मिळतांच आपला डाव साधावा. हें तत्त्व गेल्या शतकांतील इटालियन मुत्सद्यांनीं चांगलेंच अंमलांत आणिलें होतें. पारतंत्र्यांत जखडलेल्या इटलीचा त्या वेळचा शत्रु जो ऑस्ट्रिया, त्याच्या पाशांतून मुक्त होण्यास काऊंट कॅव्हूरप्रभृति मुत्सद्यांनीं याच उपायाची योजना केली; आणि चालू शतकांत स्वतंत्र व संयुक्त अशा इटलीला आफ्रिका खंडांत राज्य मिळवून हातपाय पसरावयाचे आहेत तेव्हांहि इटलीकडून याच धूर्त राजनीतीचा उपयोग करण्यांत येत आहे. इटलीचा आजचा शत्रु ऑस्ट्रिया नसून तुर्कस्थान आहे. तथापि, राजनीतीचें धोरण पूर्वींचेंच कायम आहे.

संधि आली असें ओळखणें आणि तिजवर झडप घालून ती साधणें हें मुत्सद्दीगिरीचें मर्मच आहे यांत शंका नाहीं. उत्तर आफ्रिकेंतील ट्रिपोली प्रांतांत इटलीचा थोडाबहुत हितसंबंध गेल्या ३०–४० वर्षांपासून जडला गेला आहे खरा. तथापि इटलीनें तुर्कस्थानशीं प्रत्यक्ष हातघाईवर यावें इतका तो हितसंबंध प्रबळ आहे असें कोणासहि म्हणतां येणार नाहीं. पण भूमध्य समुद्रालगत आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावर असणाऱ्या देशांत इतर युरोपियन राष्ट्रांनीं माजविलेला धुमाकूळ पाहून इटलीसहि स्फुरण चढलें असल्यास नवल नाहीं. इजिप्त इंग्रजांनीं व्यापला; अल्जेरिया फरान्सनें घेतला; मोरोक्कोमध्यें फरान्स, स्पेन व जर्मनी यांनीं आपापले हात इतके

घुसविले आहेत कीं, तेथील सुलतान पदच्युत होऊन मोरोक्कोची फक्त वांटणी होणेंच काय ती बाकी आहे. अशा रीतीनें आफ्रिका खंडाच्या उत्तरेच्या समुद्रकिनाऱ्यावरच्या बहुतेक भागावर युरोपियन राष्ट्रांचें वर्चस्व स्थापित झाल्यावर इटलीस ट्रिपोलीवर आपली लोभी नजर फेंकण्यास सहजच उत्तेजन आलें असलें पाहिजे. पण मोरोक्को प्रकरण इतकें हातघाईस येण्याच्या आधीं इटलीनें जर ट्रिपोलीवरहि स्वारी केली असती तर, इतर युरोपियन राष्ट्रांनीं डोळे वटारून इटलीला भेदरून खालींच बसावयास लाविलें असतें. पण मोरोक्कोप्रकरणीं फरान्स व जर्मनी यांच्या वकिलांच्या भेटी व संभाषणें अद्यापि चालूच असल्यामुळें इटलीचें फावलें. त्याला कोणत्याहि युरोपियन राष्ट्रानें लोभी, उताविळा किंवा कज्जेदलाल म्हणण्याची भीति उरली नाहीं; आणि या बिकट परिस्थितीचा फायदा घेऊन धडधडीत अन्याय करण्यास इटली प्रवृत्त झाला. गेल्या शतकांत क्रिमियन युद्ध सुरू असतां विनाकारण युद्धांत पडून थोडक्याशा खर्चानें व परिश्रमानें, इटलीनें प्रमुख युरोपियन राष्ट्रांत आपली गणना करून घेतली. तसाच कांहींसा प्रकार हल्लींहि इटलीनें फरान्स व जर्मनी यांच्या तंटयाच्या प्रसंगीं केवळ समय-सूचकतेच्या गुणानें साधला आहे.

इटलीच्या हल्लींच्या कृतीस अन्याय्य म्हणण्याचें कारण हेंच कीं, ट्रिपोली देशांत तुर्की अंमलाखालीं थोड्याशा इटॅलियन लोकांस केव्हां केव्हां थोडासा त्रास सोसावा लागत असेल हें जरी खरें आहे तरी, “ तुर्कस्थानच्या सुलतानाच्या प्रत्यक्ष ताब्यांत असलेल्या या प्रांतांत बळजबरीनें शिरून आपलीं लष्करी ठाणीं बसवून त्यांचें स्वामित्व आपण घेणार, आणि तुर्कस्थानला फार तर नुकसानीदाखल पांचपंचवीस लक्ष पौंड देऊन टाकणार म्हणजे झालें, ” अशा अर्थाचा जो उद्योग इटलीनें आरंभिला आहे तो सर्वथैव बरोबर नाहीं. आधीं कारण फार थोडें, व कारण सबळ असलें तरी जी कृति करण्याचें इटलीनें योजलें आहे ती निव्वळ दांडगाईची आहे. ट्रिपोली हा तुर्कस्थानच्या अंमलाखालचा प्रांत. त्यांत इटॅलियन व्यापाऱ्यांस आधीं जाण्यास सांगितलें होतें कोणीं ? ते जाते वेळीं त्यांना सुलतानी राजपद्धतीची खबर नव्हती कीं काय ? व ही खबर असतांहि तेथें गेलेल्या इटॅलियन व्यापाऱ्यांनीं, इतर तुर्की प्रजेप्रमाणें, सुलतानास अर्ज करून किंवा नवीन बनलेल्या

तुर्की पार्लमेंटांत लोकमत आपल्या बाजूस करून घेऊन हवा तो न्याय मिळविण्यास कोणची हरकत होती ? तुर्की राज्यव्यवस्थेचा कितीहि बदलौकिक असला तरी मूठभर इटॅलियन व्यापाऱ्यांकरितां इटलीनें एकदम तुर्कांवर हत्यार धरावें यांत राष्ट्राराष्ट्रांतील शिष्टाचाराचा उपमर्द होत नाहीं काय ? तुर्की राज्यांतील इतर प्रजेप्रमाणें ट्रिपोलींतील इटॅलियन व्यापाऱ्यांनीं बंड करून आपली दाद लावून घेतली असती तरीहि एक वेळ त्यांस कोणीं नांवें ठेविलीं नसतीं. " सनदशीर रीतीचे सर्व उपाय थकल्यामुळें ही गोष्ट त्यांना नाइलाजास्तव करणें भाग पडलें; तथापि तुर्की अंमल झुगारून देण्याचा त्यांचा इरादा नाहीं. तर त्याच अंमलाखालीं राहण्याची पण आपली दाद लावून घेतल्याशिवाय न थांबण्याची त्यांची उत्कट इच्छा आहे. " एवढेंच सिद्ध झालें असतें; व यामुळें इटॅलियन व्यापाऱ्यांच्या बंडाळीस सोळा आणे सनदशीरपणाचें स्वरूप न राहिलें तरी निदान त्यांच्या चळवळीस सनदशीरप्राय ( Extra constitutional ) असें नांव मिळालें असतें. पण ही प्रजा केवळ हाडामांसानें इटॅलियन आहे एवढ्याच करितां इटलीनें ट्रिपोलीवर बेधडक लष्करी स्वारी करावयाची म्हणजे, राष्ट्राराष्ट्रांच्या वागणुकीस कांहीं आळा किंवा धरबंध राहिला नाहीं असेंच म्हणावें लागेल.

युरोपियन राष्ट्राराष्ट्रांत जर असा कोणीं अत्याचार केला असता तर इतर प्रबळ राष्ट्रांनीं लगेच मध्यें पडून न्याय केला असता; पण तुर्कस्थान पडलें एशियाटिक राष्ट्र, सबब युरोपियन राष्ट्रांस त्याचा कळवळा येत नाहीं. सांपडेल त्यानें त्यास खुशाल चिमटा घ्यावा अगर त्याचा लचकाहि तोडावा अशी स्थिति आज जवळ जवळ ५०–१०० वर्षें चालू आहे. युरोपांतून सुलतानाचें राज्यच आज मुळींच नष्ट होईल तरी तें युरोपियन राष्ट्रांस हवेंच आहे, अशा दुर्धर स्थितींत तुर्कस्थान आजवर जिवंत राहिला हें युरोपियन राष्ट्रांच्या न्यायप्रियतेचें किंवा त्याजविषयींच्या त्यांच्या उपेक्षेचें लक्षण नव्हे. तर सुलतानाचें राज्य समूळ नष्ट झाल्यास भूमध्य समुद्राच्या किनाऱ्यावरील ऐन माऱ्याच्या जागीं कोणा तरी एका युरोपियन राष्ट्राचें वर्चस्व स्थापित होणार; व ही गोष्ट युरोपियन राष्ट्रांच्या केवळ परस्परमत्सरबुद्धीमुळें आजवर घडून येण्याची थांबली आहे; इतकेंच काय तें.

इटलीनें तुर्कस्थानशीं लढाई सुरू केलेली ऐकून हिंदुस्थानांतील मुसलमानांस जो राग आलेला दिसत आहे त्याचें झालें तरी कारण हेंच कीं, इटलीनें असा अत्याचार करावा आणि न्यायी म्हणविणाऱ्या प्रबळ राष्ट्रांनीं त्याचा प्रतिकार करूं नये यावरून ' तुर्कस्थान हें एशियाटिक राष्ट्र आहे आणि तें हळूहळू मृत्युपंथास लागून झिजून मेलें तर युरोपियन राष्ट्रांस तें इष्टच आहे ' अशी मुसलमानांच्या मनाची पक्की खात्री होऊन चुकली आहे. आजकाल हिंदुस्थानच्या बाहेरच्याच काय पण हिंदुस्थानांतल्या राजनिष्ठ मुसलमानांसहि सुलतानी राज्यपद हें एकंदर इतिहासप्रसिद्ध अशा मुसलमानी सत्तेचें केंद्र-स्थान असें वाटत आहे. सर्व शरीरांत काळजाला जें महत्त्व व जो मान तें महत्त्व व तो मान चोहोंकडील मुसलमान रूमशामच्या पातशाहीस देत असतात. अर्थात् काळजावर घातलेल्या आघातास मुसलमानांकडून भावनेच्या रूपानें प्रत्याघात व्हावा ही गोष्ट साहजिकच आहे. प्रारंभीं तुर्कांचा राज्यविस्तार वाढण्यास ईश्वरानें सनदच दिली होती असें नाहीं. तथापि टर्कीइतकें पसरलेलें व बलाढ्य राज्य हळूहळू संकुचित होऊं लागणें हें ऱ्हासाचें निःसंशय लक्षण होय; आणि मुसलमानी पातशाहीचा जो ऱ्हास तोच मुसलमानी धर्माचा ऱ्हास अशा समजुतीनें मुसलमानांस त्याचें वाईट वाटत आहे.

हल्लींच्या स्थितींतहि तुर्की राज्याचा एकंदर विस्तार १५॥ लक्ष चौरस मैल असून तुर्की राज्यांतील प्रजेची लोकसंख्या ३॥ कोट आहे. वर सांगितल्याप्रमाणें सुलतानाच्या ताब्यांतून गेलेले ग्रीस, सर्व्हिया, बलगेरिया, वगैरे देश लक्षांत न घेतां, आणि तसेंच क्रीट, सायप्रस, इजिप्त वगैरे सुमारें ४ लक्ष चौरस मैलांचा व १ कोटी प्रजेचा मुलूख—त्याजवरील सुलतानाची सत्ता केवळ नामधारी उरलेली आहे सबब तो—वगळला तरी युरोप, आशिया व आफ्रिका या तीन खंडांत मिळून तुर्की सुलतानाच्या अगदीं प्रत्यक्ष अंमलाखालीं असा ११॥ लक्ष चौरस मैलांचा मुलूख व २॥ कोट प्रजा आज आहे. म्हणजे इंग्लंद, स्कॉटलंद, आयर्लंद मिळून इंग्रजांचा खास स्वराज्याचा जो मुलूख आहे त्याच्या जवळ जवळ दहापट इतका मुलूख सुलतानाच्या प्रत्यक्ष अमलाखालीं आहे. सुलतानाच्या प्रत्यक्ष अमलाखालीं असलेल्या २॥ कोट प्रजेपैकीं मुसलमानी धर्माचे लोक जरी अर्थात् पुष्कळ आहेत तरी युरोपियन-ख्रिस्ती व एशियाटिक-ख्रिस्ती हे कांहीं थोडेथोडके नाहींत. क्षेत्र-

विस्ताराच्या मानानें व लोकसंख्येच्या मानानें सुलतानी पातशाहीचें उत्पन्न मात्र बरेंच थोडें आहे; आणि अंतर्व्यवस्था ठीक नसल्या-मुळें सरकार व प्रजा दोन्हीहि गरीब असून स्वसंरक्षणाकरितां जरूर तितकें आरमार सुलतानाच्या पदरीं नाहीं. यामुळें सुलतानी पातशाहीच्या अंगचे लचके वेळोवेळीं तोडण्यास युरोपियन राष्ट्रांस फावलें असून तुर्की राष्ट्राचा पदोपदीं अपमान होत आला आहे. गेल्या शतकांत रशिया, ऑस्ट्रिया, ग्रीस, बलगेरिया, सर्व्हिया वगैरे ख्रिस्ती राष्ट्रांनीं तुर्कांवर हत्यार उपसलें. येऊन जाऊन इंग्लंद व जर्मनी या दोघांचीच काय ती सुलतानाला आलटून पालटून सहानुभूति मिळालेली आहे. पण ती केवळ आपापल्या कारणांपुरतीच असून सुलतानाला आपला कायमचा असा मित्र कोणासच मानतां येत नाहीं. गेल्या एका शतकांत रशियानें तुर्की आरमार दोन वेळां बुडविलें तेव्हां त्याच्या मदतीस कोणी गेलें नाहीं. खुद्द इंग्लंद, फरान्स वगैरेंनीं मिळून सन १८२९ सालीं स्वतःच तुर्की आरमार एक वेळ बुडविलें; व आज इटली हा चांचे लोकांप्रमाणें समुद्रावर उघड अन्याय व दांडगाई करीत असतां त्यास कोणी मनाई करीत नाहींत. तसेंच ख्रिस्ती प्रजेनें तुर्की प्रजेचे अन्याय केले तर खपले जातात. पण तुर्की प्रजेनें मात्र ख्रिस्ती प्रजेशीं थोडी मारामारी केली कीं, सर्व युरोपखंडभर एकच हाकाटी उठून तुर्कस्थानास खाऊं कीं गिळूं असें युरोपियन राष्ट्रें करितात. तथापि, सशक्त मनुष्य झिजून झिजून मेला तरी त्यास बराच काळ लागतो. कांहीं नाहीं म्हटलें तरी सुलतानाच्या पदरीं आज २॥ लाख कायमचें सैन्य असून युद्धाच्या प्रसंगीं तें ८–१० लाखांपर्यंत वाढवितां येईल असें म्हणतात. तुर्की लोकांची लढाऊ या नात्यानें पूर्वापार प्रसिद्धि आहेच. सन १८७७ सालीं रशियाशीं व १८९७ सालीं ग्रीसशीं युद्ध जुंपलें तेव्हां तुर्कांनीं आपलें क्षात्र तेज जगाच्या निदर्शनास चांगलेंच आणलें. अशा राज्याची अंतः-सुधारणा केली असतां तें युरोपियन राष्ट्रांस हार जाणार नाहीं, अशा महत्त्वा-कांक्षेनें देशाभिमानी तरुण तुर्कीमंडळ उद्योगास लागलेलें आहे; आणि युरोपियन राष्ट्रांच्या परस्पर मत्सराची त्यास थोडीबहुत मदत होण्याचाहि संभव आहे.

मुसलमानांच्या सर्व जातींत आरबी व तुर्की मुसलमानांइतके पराक्रमी

व प्रख्यात दुसरे कोणतेच झाले नाहींत. मुसलमानी धर्माचा मुख्य संस्थापक महंमद पैगंबर हा इ. स. ६३२ सालीं मरण पावला. तेथून पुढील १०० वर्षांत---म्हणजे सन ७३२ या सालीं फरान्समध्यें चार्लस मारटेल यानें मुसलमान लोकांचा पराभव करीपर्यंत---अरब लोकांनीं पूर्वेस इराणपासून तों पश्चिमेस फरान्सपावेतों अव्याहत दिग्विजय केला, व सर्व युरोपखंडभर त्यांनीं आपल्या नांवाचा दरारा वसविला. ६३३ ते ३९ या सात सालांत त्यांनीं सिरीया प्रांत जिंकला. इजिप्त जिंकण्यास त्यांना २-३ वर्षेंहि लागलीं नाहींत. सन ६३७ सालीं त्यांनीं खिरस्ती धर्माचें मुख्य पवित्र क्षेत्र जें जेरुसलेम तें हस्तगत केलें. दमास्कससारखीं प्रचंड राजधानीचीं शहरें त्यांनीं वेढा घालून तेव्हांच काबीज केलीं. इराण संपूर्ण पादाक्रांत करण्यास त्यांना थोडा वेळ लागला खरा; परंतु सन ६५१ सालीं इराणावर त्यांचा अंमल बसला. आफ्रिका खंडावर मुसलमानांची पहिली स्वारी सन ६४७ सालीं झाली; व पुढील ५० वर्षांत सर्व उत्तर आफ्रिका त्यांचे हस्तगत झाली. रोमशीं स्पर्धा करून नाश पावलेलें इतिहासप्रसिद्ध कार्थेज शहर त्यांनीं ६९८ सालीं घेतलें. इकडे इराणी आणि इकडे ग्रीक व रोमन यांच्याशीं लढून त्यांचा पराभव केल्यामुळें युरोपखंडांत प्रवेश करण्याची मुसलमानांस सहजच महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली. परंतु पश्चिमेकडे त्यांस प्रतिबंध झाल्यामुळें दक्षिणेकडे भूमध्य समुद्रांतून सन ७१० सालीं ते स्पेनमध्यें उतरले. पुढील दोन तीन सालांत मुसलमान सरदार मुस यानें सर्व स्पेन देश जिंकला; व सन ७२१ सालीं त्यांनीं फरान्सवर स्वारी केली. सन ६६८ पासून रोमन पादशाहीची राजधानी जें कॉन्स्टँटिनोपल शहर त्यावर मुसलमान लोकांच्या स्वाऱ्यांस प्रारंभ झाला होता. क्रीट व सिसिली हीं बेटें नवव्या शतकाच्या प्रारंभीं घेऊन, इटली व रोमन पादशाहीची राजधानी जें रोम शहर त्यास मुसलमानांनीं शह दिला. सन ८४० पासून सन १०१७ पर्यंत इटलीमध्यें लॅटिन, ग्रीक व सॅरॅसन म्हणजे मुसलमान यांचीं युद्धें चालू होतीं; पण मुसलमानांच्या दिग्विजयांस बहुधा कोठेंहि अडथळा म्हणून फारसा आला नाहीं. प्रसिद्ध इतिहासकार गिबन यानें रोमन पादशाहीवरील पुस्तकांत असें म्हटलें आहे कीं, जिब्राल्टरच्या पाहाडी किल्ल्यापासून उत्तरेस लॉयर नदीपर्यंत ज्या झपाट्यानें मुसलमानांनीं देश काबीज केला, त्याच झपाट्यानें आणखी

एक हजार मैल ते वर चढले असते तर स्कॉटलंदांतील हायलंदचे पाहाडी प्रदेश व पोलंदची सरहद्द या ठिकाणीं मुसलमानांचा अर्धचंद्र व हिरवें निशाण फडकूं लागलें असतें. ज्यांनीं टाइग्रीस, युफ्रॅटिस, नाइल यांसारख्या नद्या खुशाल ओलांडल्या त्यांना ऱ्हाइन नदी ओलांडणें बिलकुल अवघड गेलें नसतें; व ती त्यांनीं ओलांडली असती तर कोणत्याहि तऱ्हेचा अडथळा न होतां 'तमसा' नदीच्या मुखांतून त्यांना इंग्लंडांत सहज शिरतां आलें असतें; आणि आजच्या घटकेस ऑक्सफर्ड येथील विद्यालयांतून कुराणाचा असा जारी अभ्यास चालू असता कीं, महंमदाच्या दिव्य ज्ञानाची थोरवी मुसलमानांनीं ख्रिस्ती लोकांस सांगण्याऐवजीं इंग्रज लोकच मुसलमानांस ती सांगूं लागले असते ! पण वर सांगितल्याप्रमाणें चार्लस मारटेल याच्या पराक्रमानें मुसलमानांच्या प्रगतीच्या प्रवाहास फरान्सच्या मध्यभागीं जो एकदां बांध पडला तो कायमच झाला.

परंतु आरबांच्या हातून थांबलेलें काम अकराव्या शतकांत तुर्कांनीं चालू केलें. १०५० सालीं मोडकळीस आलेल्या रोमन साम्राज्यावर त्यांनीं हल्ले चढविण्यास सुरुवात केली. १०६९ सालीं तुर्कांनीं जेरुसलेम पुनः हस्तगत केलें; व पुढें झालेल्या 'क्रूसेड' नामक धर्मयुद्धांत जरी तें दोन तीन वेळां एकदां मुसलमानांनीं व एकदां ख्रिस्त्यांनीं ताब्यांत घेतलें तरी अखेर सन १२९१ सालीं तें मुसलमानांच्याच हातीं कायमचें गेलें. दरम्यान तेराव्या शतकाच्या अखेर तुर्कांनीं कॉन्स्टँटिनोपल हस्तगत करून तेथें तुर्की साम्राज्याची गादी स्थापन केली तेथपासून आजपर्यंत तुर्की साम्राज्याचें निशाण कॉन्स्टँटिनोपल येथें फडकत असून, युरोपियन राष्ट्रांच्या काळजांत तुर्की राज्य शल्याप्रमाणें टोंचत राहिलें आहे. शिवाय, अलीकडील दोनतीन शतकांत तुर्की राष्ट्राचा ऱ्हास व युरोपियन राष्ट्रांचा उदय एकसमयावच्छेदें करून होत गेल्यानें, तुर्की साम्राज्याचा एकेक अवयव संधि सांपडेल तसतसा युरोपियन राष्ट्रें कापून घेऊं लागलीं आहेत. भूमध्य समुद्राचे दोन्ही अंगांस एक वेळ तुर्की राज्य होतें. पण गेल्या १०० वर्षांत ग्रीस, बलगेरिया, रोसानिया, सर्व्हिया, बॉस्नीया, हर्जगोव्हिना वगैरे युरोपखंडांतील तुर्की अंमलाखालचे प्रदेश युरोपियन राष्ट्रांनीं तोडून घेतले; आणि हल्लीं भूमध्य-समुद्राच्या दक्षिण किनाऱ्यालगत आफ्रिका खंडाच्या उत्तरेस तुर्की अंमलाखालीं

जे प्रदेश होते तेहि हस्तगत करण्याचा युरोपियन राष्ट्रांचा प्रयत्न सुरू आहे. पैकीं इजिप्तवर तुर्की सुलतानाची हल्लीं फक्त नांवाचीच सत्ता उरली आहे. ट्रिपोलीवर प्रत्यक्ष सत्ता आजवर होती; पण तीहि इटलीच्या लुटारूपणाच्या प्रवृत्तीनें आणि इतर युरोपियन राष्ट्रांच्या तटस्थपणामुळें नष्ट होण्याच्या बेतांत आहे. या अत्याचारास सुलतान प्रतिकार करूं शकेल कीं नाहीं, याची शंकाच वाटते. दोन वर्षांपूर्वीं कॉन्स्टँटिनोपल येथें राज्यक्रांतीची धुमश्चक्री माजली असतां बॉस्निया व हर्जगोव्हिना या प्रांतावरचें सुलतानाचें निशाण ऑस्ट्रियन बादशहानें संभावितपणानें नुसतें काढून फेंकून दिलें आणि केवळ एका केवळ जाहीरनाम्याच्या कागदी पराक्रमानें हे प्रांत खालसा करून ऑस्ट्रियाच्या राज्यास जोडले. अर्थात् या वेळीं देशांतील राज्यक्रांतीच्या गडबडीमुळें तुर्की सरकारास प्रतिबंध करतां आला नाहीं. पण गेल्या वर्षांत तुर्कस्थानमध्यें स्थिरस्थावर होत असून राज्यकारभारास थोडीबहुत शिस्त लागली आहे; यामुळें, ट्रिपोली प्रांतहि अगदींच लढल्याशिवाय नव्या दमानें तुर्की मुत्सद्दी हातून जाऊं देतील असें वाटत नाहीं. तुर्की सरकारचें आरमार असें बहुधा नाहींच म्हटलें तरी चालेल. आज जीं कित्येक युरोपियन राष्ट्रें तुर्की सरकारसंबंधानें सहानुभूति दाखवीत आहेत, त्यांनीं ७५ वर्षांपूर्वीं तुर्की सुलतानाच्या इजिप्शियन सुभेदाराची कड घेऊन तुर्की आरमार सफई बुडवून टाकिलें; आणि सुलतानी हलगर्जीपणामुळें तुर्की आरमार आजवर बांधलें गेलें नाहीं. यामुळें इटलीला आपलें सैन्य ट्रिपोलींत उतरविण्यास फारशी पंचाईत पडणार नाहीं. परंतु ट्रिपोलीमध्यें सैन्य उतरवून बंदरें हस्तगत करणें हें जरी इटलीस सोपें गेलें तरी सर्व देश कायमचा ताब्यांत ठेवणें जड जाईल. गेल्या तुर्की राज्यक्रांतीमध्यें पुढारीपणा घेऊन उदयास आलेले तरुण तुर्की लष्करी सरदार एनवरबे हे ट्रिपोलींत जाऊन तेथील मुसलमान लोकांच्या मदतीनें गनिमी काव्याची लढाई सुरू करण्याकरितां ट्रिपोलीस जात आहेत असें प्रसिद्ध झालें आहे. अर्थात् हें प्रकरण बरेंच दिवस धुमसत राहील असें वाटतें. इटलीच्या दांडगाईमुळें जगांतील बहुतेक मुसलमान चिडून गेले आहेत. व 'क्रूसेड'च्या धर्मयुद्धाच्या वेळीं मुसलमान व ख्रिस्ती यांच्यामध्यें जें धर्ममूलक वैर पूर्वीं माजलें होतें तेंच आज जागृत होऊं पाहत आहे.

## लेख तेरावा

# पेशवे-दप्तर खुलें करा

[ता. ४ जुलै १९३२ रोजीं भा. इ. सं. मंडळाच्या २२ व्या वाढ-दिवसानिमित्त केलेलें भाषण. ]

"पुणें दप्तरासंबंधाची सर्व हकीकत प्रो. पोतदार यांनीं पूर्वी सविस्तर सांगितलीच आहे. त्यानंतर भा. इ. सं. मंडळाच्या कारभारी मंडळानें जो ठरावाचा मसुदा केला तोच मी आपणांपुढें मांडीत आहें. इंग्रज सरकार हें सुधारलेलें असल्यामुळें त्यांचे हातून उच्च संस्कृतिदर्शक अशीं कामें पुष्कळ झालीं आहेत. लॉर्ड कर्झन यांनीं पुराणवस्तुसंशोधन खात्याचा कायदा व खर्चाचें खातें निर्माण केलें तें अशा संस्कृतीचेंच एक निदर्शक होय. इंग्रज लोक ऐतिहासिक पत्रसंग्रहांचे मोठे भोक्ते आहेत. लंडनमधील इंडिया ऑफिसमध्यें त्यांनीं ठेवलेला संग्रह उत्कृष्ट असून त्याचा उपयोग लोकांना चांगला होतो. कलकत्त्याचाहि संग्रह असाच आहे. पण दुर्दैवानें मुंबई सरकारच्या वांटयाला सुसंस्कृत मनाचा रेव्हेन्यू कमिशनर मध्यभागाला आजवर मिळाला नाहीं. किंवा असें म्हणतां येईल कीं, मराठ्यांचा इतिहासच असा लोकविलक्षण असला पाहिजे कीं, तो वाचून उत्पन्न होणारी स्फूर्ति कदाचित् मुंबई सरकारला अनिष्ट वाटत असेल ! निमित्त असें सांगण्यांत येतें कीं, पुणें-दप्तरांतील कागदपत्रांत सरकारचे रेव्हेन्यू खात्याचे हितसंबंध निगडित आहेत. पण तें फारसें खरें नाहीं. इनाम कमिशनची चौकशी, त्याचे निर्णय, संशयास्पद सनदांचा नाश, नव्या सनदांच्या देणग्या वगैरे गोष्टी पाऊणशें वर्षांपूर्वी होऊन गेल्या. आतां दप्तरांतील कसलाहि हक्काचा कागद कोणाला सांपडला तरी कायद्याच्या दृष्टीनें त्यावरून सरकारवर फिर्याद लागणेंच शक्य नाहीं. अशा कागदपत्रांचें दप्तरहि अगदीं स्वतंत्र ठेवलें असून त्याची व्यवस्थाहि स्वतंत्र नियमांनीं होते. आणि मि. लोगन-सारख्या कमिशनरांनींहि पूर्वी उघड कबूल केलें आहे कीं, दप्तरांतील कागद-पत्रांपासून सरकारला आतां कसलीहि भीति उरलेली नाहीं व कागदपत्रांची विभागणी वगैरेहि व्यवस्थित केलेली आहे. जें काय झालेलें नाहीं तें इतकेंच

कीं इनाम (एलिएनेशन) दप्तराव्यतिरिक्त इतर कागदांचा जो गळाठा आहे त्याचें बोटखत किंवा यादी झालेली नाहीं. अशी यादी (हँडलिस्ट) करणें हें अर्थात् फारच खर्चाचें काम आहे हें कोणीहि कबूल करील. पण 'दप्तर पाहण्यास परवानगी द्या,' म्हणणाऱ्या लोकांचा अशा यादीबद्दल आग्रहच नाहीं. अशी यादी असेल तर अर्थात् कागदपत्र मागून घेण्याला व वाचण्याला अभ्यासकाला मदत होईल; पण सरकारच्या हितरक्षणाला अशा यादीपासून कांहीं मदत होणारी नाहीं. अन्नछत्रांत जेवावयास जाऊन मिरपुडीचा हट्ट कोण धरील ? पण या यादीच्या सूचनेचा गैरवाजवी फायदा सरकारनें दुहेरी करून घेतला आहे. तो असा कीं, याद करणें हें काम खर्चाचें म्हणून ती करीत नाहीं असें म्हणावें, व अशी याद नाहीं म्हणून वाटेल त्याला दप्तर पाहूं देतां येत नाहीं असें म्हणावें. पण नुसतें दप्तर खुलें करून देणें म्हणजे वाचकांनीं येऊन वाचून कागदपत्रांचीं टिपणें करून घेणें यांत खर्च असेल तर तो वाचकाला. कारण दप्तराची इमारत गांवापासून लांब आहे. जातां येतां टांगेवाल्यालाच रुपया द्यावा लागावयाचा ! उलट हल्लीं आहे एवढ्याच खर्चांत किंबहुना एक कारकून व एक शिपाई एवढ्या खर्चांत दप्तर वाचण्याची सोय सरकारास करतां येईल. या वाचनापासून सरकारवर फिर्याद होऊं शकणार नाहीं, हें सांगितलेंच आहे.

## कागदाची चोरी कोण करील ?

उरली भीति येऊन जाऊन चोरीची ! पण एकादें स्वतंत्र टेबल ठेवून शिपाई व कारकून यांच्या नजरेखालीं कागद वाचण्याची परवानगी ठेवल्यास चोरीचीहि भीति उरणार नाहीं. मोठमोठ्या ग्रंथसंग्रहालयांतून फार तर इतकीच खबरदारी घेतली जाते व तेथील ग्रंथ भारी किंमतीचेहि असतात. पुणें दप्तरांतील एकादा कागद अगदीं चोरीला गेलाच असें मानलें तरी, मनुष्याला आपल्या अंगावरील एकादा केस गेल्यानें जितकें नुकसान वाटेल तितकें देखील मुंबई सरकारला या ऐतिहासिक स्वरूपाच्या दप्तरांतील एकादा कागद चोरीला गेल्यानें वाटणार नाहीं. इनामी कागदपत्र सोडून दिले तर पेशव्यांच्या रोजनिशा, बारनिशा, गांवच्या जमाबंदीचे कागद, पुणें शहरांतील पेठवार वसाहतीचे व व्यवस्थेचे कागद, मुलुखगिरीवरील मुक्कामांचे कागद,

चिटणीशी पत्रव्यवहाराचे कागद, खाजगी पत्रव्यवहाराचे कागद, पेशव्यांच्या वाड्यांतील धर्मादाय, धार्मिक समारंभ, लौकिक समारंभ, त्यांची गृहव्यवस्था यासंबंधाचे कागद, यांचा सरकारला काय उपयोग ? व त्यांतील टिपणें किंवा नकला कोणी करून घेतल्यास त्यांत कोणती हानि ?

शिवाय हें सर्व दप्तर आतां सुप्रसिद्ध इतिहासज्ञ रावसाहेब सरदेसाई व त्यांच्या हाताखालचे रीडर लोक यांच्या नजरेखालून गेलेंच आहे. व त्यांतील कांहीं नमुनेदार कागदपत्र सरकारनें प्रकरणरूपानें छापलेहि आहेत. अशा रीतीनें सरदेसाई यांनीं संशोधिलेले हजारों कागद आतां इतरांनाहि निर्बंध रीतीनें वाचावयास कां मिळूं नयेत ? आणि त्याचप्रमाणें सरकारनें महत्त्वाचे नाहींत अशा समजुतीनें बाजूला टाकून दिलेलेहि कागद ! रावसाहेब सरदेसाई यांनीं कांहीं कागद निवडून छापले म्हणून बाकीच्या इतर कोणाहि संशोधकाला उरलेल्यांतून कांहींच ऐतिहासिक माहिती मिळणार नाहीं, असें कसें म्हणतां येईल ? भरलेल्या केरांत किंवा गटारांतील मातींतहि केव्हां केव्हां सोनें सांपडतें. तेव्हां कोणा संशोधकाची कशी नजर चालेल व त्याला कोणत्या कागदाचा कसा उपयोग होईल हें कोणीं सांगावें ? सरदेसाई यांनीं निवडून काढून छापलेल्या कागदांचें प्रमाण दप्तरांतील एकंदर कागदांशीं शेंकडा १ किंवा २ इतकें तरी पडेल कीं नाहीं कोणास ठाऊक ? व स्वतः रा. सा. सरदेसाई यांनाहि विचारलें तर त्यांचें हल्लींचें काम पुढें चालू राहिलें किंवा न राहिलें तरी, लोक मागतात अशा रीतीनें वाचकांना दप्तर खुलें करण्याला ते संमतीच देतील, हरकत सुचविणार नाहींत अशी आमची खात्री आहे. कागदपत्रांच्या याद्या करण्याकरितां म्हणून ते व त्यांची रीडर मंडळी यांची नेमणूक झाली असतां त्यांनीं याद्यांचें काम बाजूला टाकून निवडक कागद प्रकरणवार छापण्याचें काम केलें, याचें कारण बहुधा असें असावें कीं, त्यांच्या नेमणुकीच्या काळांत याद्यांचें काम त्यांनीं कितीहि खपून केलें असतें तरी तें थोडेंच म्हणजे अपूर्ण व निष्फळ होणार ! पण त्याऐवजीं कागद निवडून कांहीं छापलें तर कांहीं प्रकरणें तरी सुसंगत तयार होऊन अशा दप्तरांचा उपयोग इतिहास–संशोधक कसा करूं शकतो हें तरी दाखवितां येईल; व तें रा. सा. सरदेसाई यांनीं चांगलेंच दाखविलें यांत शंका नाहीं.

## याद्या नव्हे तर हँडबुक

त्यांत गफलत इतकीच झाली कीं, इकडे हें असें काम चालू असतां सरकार आपण याद्या तयार करवीत आहों याच भ्रमांत राहिलें; व कायदेकौन्सिलांतील प्रश्नांना उत्तरें देतांना युरोपियन मेंबरांनीं अज्ञानामुळें स्वतःस हास्यास्पद करून घेतलें. तात्पर्य, पुणें दप्तर वाचकांना खुलें करण्याच्या बाबतींत हा याद्यांचा मुद्दा अजिबात सोडून दिलेला बरा. तें फार मोठ्या खर्चाचें काम असून त्याऐवजीं त्रोटक माहितीचें एकादें हँडबुक तयार केलें तरी वाचकांचें काम भागेल म्हणजे कोणचा रुमाल मागावा हें वाचकाला कळेल व कोणता द्यावा हें कारकुनाला कळेल; आणि अशा प्रकारचें लहानसें हँडबुक, आतां दप्तरांतील खडान्‌खडा माहिती झाल्यामुळें रा. सा. सरदेसाई यांना स्वतःला तेव्हांच करतां येईल; व परवानगी घेऊन त्यांनीं तें करावेंच अशी माझी सूचना आहे. पुणें दप्तरांतील कागद वाचावयास मागण्याचा महाराष्ट्रांतील अभ्यासकांना हक्क आहे, व तो त्यांना मिळालाच पाहिजे. शिवाय त्या हक्कावरील हल्लींचे सर्व निर्बंध निघून गेलेच पाहिजेत. हल्लीं कमिशनराकडून घालण्यांत येणारे निर्बंध सर्वस्वीं हास्यास्पद आहेत. पण त्याचें कारण हेंच कीं, कांहीं तरी खोटा बाऊ वाटून हे कागद वाचावयास द्यावयाला सरकार अंग चोरतें. अलीकडे सरकारच्या खर्चानें फरँक्स नांवाच्या एका युरोपियन गृहस्थानें बेटावरील रेसिडेन्सी दप्तरांतील कागद टाईप करून ठेविले आहेत. ते वाचण्याची परवानगी मीं स्वतः मागितली असतां कमिशनरसाहेबांनीं ती नाकारली. कारण काय तर ते कागद सरकारनें अजून वाचावयाचे आहेत. आतां सरकार वाचणार व मग आम्हांस वाचावयास मिळणार याची नुसती वाटच पाहत बसलें पाहिजे ! या सर्व कारणांकरितां हा ठराव आपल्यापुढें मांडला आहे; तो मंजूर झाल्यास त्याच्या आधारें या एका बाजूच्या पण महत्त्वाच्या प्रश्नाबद्दल योग्य ती चळवळ करण्याचा इतिहासभक्तांचा विचार आहे.

---

## लेख चौदावा

# शिवाजी महाराजांचें हस्ताक्षर

[ केसरी, ता. २६ डिसेंबर १९२३ ]

महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक रा. आबा चांदोरकर व रा. आ. बा. जोशी बारामतीकर यांच्या संयुक्त प्रयत्नानें मराठ्यांच्या इतिहासाच्या एका विशिष्ट अंगासंबंधाचें एक अत्यंत उपयुक्त पुस्तक आजच प्रत्यक्ष प्रसिद्ध होत आहे. हें अंग ऐतिहासिक पुरुषांच्या साक्षरतेचें होय. या साक्षरतेचे सुमारें अडीचशे नमुने फोटोझिंको पद्धतीच्या हुबेहुब छायाचित्रांच्या रूपानें प्रस्तुत पुस्तकांत संग्रहीत केले आहेत. 'साक्षरता' याचा अर्थ सामान्यतः 'लिहितां वाचतां येणें' असा असतो. पण कांहीं लोकांना फक्त वाचतां येतें, लिहितां येत नाहीं. हा साक्षरतेंत एक भेद आहेच. परंतु हे नमुने त्या सामान्य प्रकारच्या साक्षरतेचे नसून प्रत्यक्ष हस्ताक्षरांचे आहेत. व त्यांतूनहि हें हस्ताक्षर सहीच्या रूपाचें म्हणजे तद्दर्शक मायन्यांच्या अक्षरांत लिहिलेलें आहे. त्यांतील कांहीं हस्ताक्षरें पुणें येथील भारत इतिहास-संशोधक मंडळाच्या प्रदर्शनांत लावून ठेविलेलीं अनेकांनीं पाहिलीं असतील. तथापि इतर बरींचशीं हस्ताक्षरें पुण्यांतील 'सरकारी पेशवाई दप्तरखान्यांतील' कागदांवरून या ग्रंथांत घेतलेलीं आहेत; आणि इतकें म्हटलें म्हणजे त्यांची दुर्मिळता व त्या कारणानें सिद्ध होणारें त्यांचें महत्त्व वेगळें स्पष्ट करून सांगण्याचें कारणच नाहीं.

या सरकारी दप्तरांत आधीं प्रवेश मिळणें हें अति दुर्घट असल्याचें प्रसिद्धच आहे. तथापि रा. गोविंदराव सरदेसाई यांच्या सहानुभूतीनें अशी कष्टसाध्य परवानगी मिळवून, राजश्री चांदोरकर व जोशी यांनीं हा जो महत्प्रयासाचा उद्योग केला तो खरोखरीच अभिनंदनीय होय. हीं अडीचशें हस्ताक्षरें अशा ऐतिहासिक पुरुषांचीं आहेत कीं, त्यांचीं नांवें मराठ्यांच्या इतिहासांत ठळक अशीं गणलीं जातात. आणि त्यांतील कांहीं कांहीं अक्षरें जीं स्त्रियांचीं आहेत, तीं एका वेगळ्या दृष्टीनेंहि कौतुकास्पद ठरतात. तीं ट म्हणजे मराठेशाहींतील स्त्रियांची साक्षरता ! साक्षरतेचे हे अडीचशें

नमुने छायाचित्रांच्या कायम स्वरूपांत म्हणजे अगदीं हुबेहुब मुळांत पाहावे तसे वाचावयास मिळतात; इतकेंच नव्हे तर तीं अक्षरें ज्या कागदपत्रांवरून घेतलीं त्या कागदपत्रांची तपशीलवार माहिती म्हणजे लेखकांचीं नांवें, जन्म-मृत्युच्या तिथि, त्यांचें संक्षिप्त ऐतिहासिक वर्णन, त्यांच्या मुद्रा इत्यादि देऊन, प्रामाण्याचे जितके तणावे लावून त्यांचें व्यक्तित्व ऐतिहासिक रीत्या निश्चित व ठाम करतां येईल तितकें करण्याचा प्रयत्न संपादकद्वयानें केला आहे. म्हणून असलें हें हस्ताक्षरवर्णनाचें पुस्तक प्रसिद्ध झालें याबद्दल मराठी वाचक, विशेषत: मराठ्यांच्या इतिहासाचे भक्त व प्रेमी जन, या संपादकद्वयांचे ऋणी राहतील यांत शंका नाहीं.

हस्ताक्षरानें मनुष्याचा स्वभाव व चारित्र्य समजतें अशी एक कल्पना किंवा उपपत्ति अलीकडे कांहीं पाश्चात्य देशांतील लोक मान्य करतात. ती खरी ठरून कोणी या सर्व हस्ताक्षरांवरून त्या त्या ऐतिहासिक व्यक्तींचे स्वभाव व चारित्र्य वर्णन करील, तर एक प्रकारचें अतींद्रिय असें ऐतिहासिक ज्ञान वाचकाला लाभेल! पण संपादकद्वयाला ती विद्या साध्य नसल्यामुळें त्यानें या हस्ताक्षरांचें फक्त वर्णन देऊनच आपली हौस भागविली आहे. या हस्ताक्षरांवरून या मनुष्यांचें शील व चारित्र्य कळो किंवा न कळो, परंतु मनानें त्या त्या ऐतिहासिक व्यक्तींचा सन्निकर्ष होण्याचें एक विशेष साधन त्यानें वाचकाला हस्तगत करून दिलें आहे, ही गोष्ट तरी खरी. यांपैकीं ज्या व्यक्ती सर्वच्या सर्व पत्र आपल्या हस्ताक्षरानेंच लिहीत अशाहि कांहीं आहेत. उदाहरणार्थ नाना फडणवीस, बाजीराव, नानासाहेब, महादजी शिंदे, छत्रपति शाहू इत्यादि. परंतु तसें न लिहितां केवळ शेवटचीं अक्षरें म्हणजे लेखनालंकार किंवा सहीच्या मायन्याचे शब्द लिहिणारेहि कांहीं आहेत. अर्थात् अशांचीं अक्षरें म्हणजे हिऱ्यांच्या खाणींत यदृच्छेनें लाभणारे हिरे किंवा हिरकण्याच होत.

पण या सर्व हस्ताक्षरांत जें अत्यंत महत्त्वाचें ठरेल असें एक हस्ताक्षर आहे व तें खुद्द शिवाजी महाराजांच्या नांवें पाठविलेल्या एका पत्रावरील होय. यांतील शेवटचीं चौदा अक्षरें 'बहुत लिहिणें तरी तुम्हीं सूज्ञ असा' अशीं आहेत. आणि शिवाजी महाराजांच्या म्हणून समजल्या गेलेल्या हस्ताक्षरांच्या नमुन्यांची दुर्मिळता लक्षांत घेतली असतां, हीं चौदा अक्षरेंच नसून मोत्यांच्या

सरांतील तीं चौदा मोत्येंच आहेत असेंच म्हणावें लागेल. माझ्या समजती-प्रमाणें आतांपर्यंत ' खुद्द शिवाजी महाराजांचें हें हस्ताक्षर ' असा हक्क ज्या-संबंधानें सांगण्यांत येतो अशीं पत्रें किंवा पत्रांच्या नकला अवघ्या सुमारें पांच-सहा आहेत. त्यांतील अस्सलावरील कांहीं अक्षरांबद्दल तें शिवाजी महा-राजांचेंच हस्ताक्षर होय अशी ग्वाही कै. राजवाडे, रा. शंकरराव देव, रा. दत्तोपंत आपटे, रा. गोविंदराव सरदेसाई इत्यादि गृहस्थांनीं दिलेली आहे किंवा दिलेली होती. पैकीं, कांहीं हस्ताक्षरें विवादित ठरलेलीं असून त्या-विषयींचे वाद जनतेपुढें आले होते. हल्लीं रा. चांदोरकर यांनीं वाचकांस सादर केलेल्या शिवाजी महाराजांच्या हस्ताक्षरासंबंधानें असाच वाद होणार नाहीं असें तरी मीं कसें म्हणावें ? कारण शिवाजी महाराज हे साक्षर होते असा पूर्ण विश्वास मनांत बाळगणारे व या बाबतींतले प्रतिपक्षी हे अपसिद्धांतवादी आहेत असें म्हणणारे इतिहासज्ञहि केवळ सत्याभिमानी म्हणून मनांतील शंका, संभवाच्या आशेबरोबरच बोलून दाखवितात.

शिवाजी महाराज हे साक्षर होते असें अभिमानानें व आग्रहानें प्रतिपादन करावें लागण्याची वेळ, केवळ वरील अपसिद्धांतवादी प्रतिपक्षीयांमुळेंच दुर्दैवानें आलेली आहे. एरवीं ज्यांनीं महाराष्ट्राला प्रत्यक्ष स्वराज्याचा लाभ करून दिला, व महाराष्ट्र संस्कृतींत युगांतर केलें, ते नुसते साक्षर होते असें प्रतिपादण्यांत भूषण मानण्याइतका मूर्ख कोण असता ! पण सत्याकरितां मूर्खाबरोबर क्षणभर मूर्खहि बनावें लागतें. पण हा मूर्खपणा सहेतुक असतो हें विसरून चालावयाचें नाहीं. शिवाजी महाराज हे केवळ काल्पनिक किंवा पौराणिक पुरुष नव्हते हें जितकें सिद्ध मानतां येईल, तितकेंच ते साक्षर होते हेंहि सिद्ध मानलें पाहिजे अशी माझी स्वतःची तरी समजूत आहे. आणि "ती समजूत खोटी कशी ती ठरवा" असा प्रत्यक्ष पुरावा मीं जसा इतरांकडून मागणार नाहीं, तसेंच "शिवाजी साक्षर होता कशावरून हें सिद्ध करण्या-विषयींचा पुरावा" कोणी मागणें हेंहि तितकेंच अप्रयोजकपणाचें होईल. अमुक एक विशिष्ट अक्षर हें शिवाजी महाराजांच्या हातचेंच होय कीं नाहीं याविषयीं वाद होणें संभवनीय आहे. परंतु शिवाजी साक्षर होता कीं निरक्षर होता अशी शंका येणें ही अप्रबुद्धपणाची कमाल होय असें मी तरी मानतों.

एका बाजस शिवाजी निरक्षर होता असा स्पष्ट उल्लेख ग्रँट डफ यानें केला आहे. उलट ‘ शिवाजीनें हातानें लिहिलेलीं पत्रें ’ ‘ शिवाजीच्या सहीचीं पत्रें ’ ‘ पत्रावर शिवाजीनें सही केली ’ असे उल्लेख कित्येक इंग्रजांच्या पत्रांतूनच आढळतात. मग त्या पुराव्यावरून तरी त्या एका इंग्रजाला या दुसऱ्या इंग्रजानें संक्षेप देण्याचें काम ‘ इंग्रजनिष्ठ ’ लोकांनीं करावयास पाहिजे होतें. पण ग्रँट डफच्या मराठ्यांच्या इतिहासविषयक प्रेमानेंच घात केला म्हणावयाचा ! तो सर्वांत अलीकडला इंग्रज इतिहासकार म्हणून तो ताजा आधार कांहीं लोकांनीं उचलला. आणि त्यावर विश्वास ठेवण्यांत त्यांची कदाचित् अशीहि भावना कारणीभूत झालेली असेल कीं, शिवाजी महाराजांचा पराक्रम आणि त्यांची मानीव निरक्षरता हीं विशेष प्रकारचा कौतुकास्पद असा विरोधाभास उत्पन्न करतात. पण विरोधाभासाच्या प्रेमामुळें साधा सारासार विचार विसरून जाणें हें अगदीं भोळेपणाचें किंवा मूर्खपणाचेंच ठरेल. शिवाजी महाराजांच्या साक्षरतेच्या जोडीला त्यांची भवानी तरवारहि येऊन बसलेलीच आहे ! म्हणजे दोन्ही सारखींच विवादित स्वरूपांत आहेत. पण भवानी तरवार आज अस्सल आढळत नाहीं यामुळें, शिवाजी हा अनत्याचारी वीर, म्हणजे हातांत शस्त्र न धरणारा होता असें मानणें जितकें हास्यास्पद तितकेंच शिवाजीचें हस्ताक्षर निर्विवाद मिळत नाहीं यावरून तो निरक्षर होता हें म्हणणेंहि हास्यास्पद ठरेल, इतकें तरी त्यांना समजावयास पाहिजे होतें !

स्वतः चांदोरकर यांनीं इतर पूर्वीच्या पत्रांतील अक्षरांना अस्सल असें मानलेलें नाहीं. याचें एक कारण, मनुष्यस्वभावाला धरून असेलहि. कां कीं, ज्याला त्याला ब्रह्म हुडकतां हुडकतां तें आपल्याच हाताला लागलें असा योग्य अभिमान उपनिषदांतील इंद्राप्रमाणें वाटत असतो त्याप्रमाणें खऱ्या इतिहाससंशोधकाला शिवाजी महाराजांच्या हस्ताक्षराचा अस्सल नमुना हा पुत्रलाभच होय. परंतु केवळ या अभिमानापेक्षांहि अधिक सबळ कारण असें सांगतां येतें कीं, चांदोरकरांच्या पत्रांतील हीं चौदा अक्षरें पूर्वी शिवाजीच्या म्हटलेल्या इतर कोणत्याहि पत्रांत नाहींत. म्हणजे शिवाजीच्या सहीच्या अर्थी हीं अक्षरें घातलेलें असें हेंच एकटें एक पत्र आज जनतेपुढें आहे, इतकें तरी निश्चित म्हणतां येईलच. पण त्याहून अधिक महत्त्वाचें प्रमाण मी जें

समजतों तें हें कीं, ह्या चौदा अक्षरांचा मायना फक्त छत्रपतींनींच लिहिण्याचा असा दंडक असल्याचें मानण्यांत येतें; व प्रत्यक्ष प्रमाणहि त्या दंडकाला पोषक असेंच आहे. कारण शिवाजी, राजाराम, शाहू व कोल्हापूर घराण्यांतील छत्रपती आणि छत्रपतीसदृश त्यांच्या घराण्यांतील राज्यकर्त्या स्त्रिया यांनींच तेवढा हा समाप्तीचा मायना वापरलेला आहे आणि तो इतर कोणत्याहि ऐतिहासिक स्त्रीपुरुषानें वापरलेला नाहीं, असें या अडीचशें हस्ताक्षरांच्या नमुन्यांवरूनच दिसून येणारें आहे !

शिवछत्रपतींच्या लेखनालंकाराच्या मायन्याचीं हींच अक्षरें लिहिलीं असलेलीं आणखी कांहीं पत्रें उपलब्ध झालीं तर, तें अक्षर व हें अक्षर ताडून पाहून वेगळें ठरल्यास या पत्राविषयीं निराळें अनुमान काढावें लागेल. पण त्या दोहोंपैकीं एक तरी खरें मानावेंच लागेल ! पण तूर्त तरी या मायन्याचें हें एकच पत्र हातीं असतां, आणि अनुमानप्रमाणाचें बळ बरेंचसें त्याच्या बाजूला असतां या मायन्यांतील अक्षरें स्वत: शिवाजी महाराजांनींच लिहिलीं असें इतर कोणत्याहि रीतीनें असिद्ध ठरेपर्यंत तें सिद्ध मानण्यास अतिरेकी चिकित्सकांसहि हरकत नसावी. तथापि, मी कांहीं इतिहास विषयांतील तज्ज्ञ नव्हे. म्हणून प्रस्तुत पुढें आलेलें अक्षर हेंच शिवाजी महाराजांचें खास हस्ताक्षर असें घेऊन चालणें योग्य होईल असें माझें मत बनलें असलें तरी तें केवळ एक मत म्हणूनच मी पुढें मांडीत आहें. तथापि, ह्या मुद्द्याची इतरांकडून चर्चा होईलच. ती झाली म्हणजे मलाहि याविषयीं अधिक ज्ञान होईलच. आणि हेंहि अक्षर शिवाजी महाराजांचें नाहीं असें उद्यां ठरलें तरी देखील शिवाजी निरक्षर होता ही गोष्ट मी कधींहि खरी मानणार नाहीं.

लेख पंधरावा

# शंभर वर्षांपूर्वीचा पारीसचा पराक्रम

[ केसरी, ता. ५ ऑगस्ट १९३० ]

## तीन दिवसांत राज्यक्रांति

राज्यक्रांति हा शब्द उच्चारतांच मनांत किती तरी विविध कल्पनांचें काहूर माजतें. राज्यक्रांतीचा व रक्तपाताचा संबंध तर अगदीं सामान्य लोकांच्या मनाला अपरिहार्य असाच वाटतो. त्याचप्रमाणें राज्यक्रांतीनें जुनी घडी मोडून नवी घडी बसवावयाची असल्यानें एवढा फेरबदल घडवून आणण्यास कालावधीहि बराच मोठा लागत असला पाहिजे अशीहि समजूत बहुतेकांची असते. पण अनुभवानें या सर्व कल्पना चुकीच्या ठरविल्या आहेत. राज्यक्रांतीचा व रक्तपाताचा संबंध हा कांहीं समवायी संबंध नव्हे. अर्थातच रक्तपाताच्या खेरीजहि राज्यक्रांति घडूं शकते. कालावधीसंबंधानेंहि असेंच म्हणतां येईल कीं, राज्यक्रांति घडून येण्याला अमुक इतका कालावधि अवश्य पाहिजेच असें नाहीं; अथवा उलटपक्षीं अमुक इतक्या कालावधींत राज्यक्रांति पूर्ण झालीच पाहिजे असेंहि नाहीं. सारांश, राज्यक्रांति हा शब्द जरी अतिशय महत्त्वाच्या घडामोडीचा वाचक असला तरी प्रसंगविशेषीं असली उलथापालथ चुटकीसरशीहि घडून येऊं शकते.

इंग्लंडच्या व फरान्सच्याहि इतिहासांत दोनहि प्रकारचीं म्हणजे उलटसुलट उदाहरणें आढळून येतात. इंग्लंडांतली पहिली राज्यक्रांति इ. स. १६४० ते १६४८ च्या दरम्यान झाली. या कालावधींत मोठमोठाल्या लढाया होऊन भयंकर रक्तपात झाला आणि इतक्या परिश्रमानें घडवून आणलेली राज्यक्रांति पुरी एक तपापर्यंतहि टिकूं शकली नाहीं. उलटपक्षीं पुढें चाळीस वर्षांनंतर १६८८ त इंग्लंडांत दुसरी राज्यक्रांति झाली. ही राज्यक्रांति अगदीं चुटकीसरशी बिनबोभाट घडून आली व तींत रक्ताचा एक थेंबहि खालीं पडला नाहीं; म्हणूनच त्या राज्यक्रांतीला इतिहासकार ' ब्लडलेस रेव्होल्यूशन ' म्हणतात. फरान्स देशांतली १७८९ त प्रारंभ झालेली

राज्यक्रांति इतिहासज्ञांस सर्वश्रुतच आहे. या राज्यक्रांतीच्या कालावधींत जितका रक्तपात झाला तितका रक्तपात तेवढ्या अवधींत इतरत्र क्वचितच झाला असेल. आणि इतकें करून पुन्हां १८१५ त सगळेंच गाडें उलटून फरान्स देशावर पूर्वीच्या बुर्बोन घराण्याचीच राज्यसत्ता परत लादण्यांत आली. आणि सोळाव्या लुईच्या जागीं अठरावा लुई येऊन पूर्वीच्या १६ आणे जुलुमाच्या जागीं १८ आणे जुलूम सोसण्याची फरेंच लोकांवर पाळी आली ! परंतु पुढें बाराच वर्षांनीं म्हणजे इ. स. १८३० च्या जुलै महिन्याच्या अखेरीस दुसरी राज्यक्रांति झाली. ही क्रांति इंग्लंडांतल्या क्रांतीप्रमाणें ' ब्लडलेस रेव्होल्युशन ' म्हणून इतिहासांतरीं प्रसिद्ध नसली तरी या वेळीं अगदीं थोडा रक्तपात झाला. आणि ही सगळी उलथापालथ अवघ्या तीनच दिवसांत घडून आली. बरोबर शंभर वर्षांपूर्वी फरान्समध्यें घडून आलेला हा ऐतिहासिक प्रसंग अनेकांना अनेक दृष्टींनीं मननीय व बोधप्रद वाटण्याजोगा असल्यामुळें त्या राज्यक्रांतीच्या शतसांवत्सरिक स्मृतिदिनाच्या प्रसंगीं त्याची त्रोटक माहिती वाचकांस देण्यांत येत आहे.

स्वतंत्रता, समता व बंधुता या त्रयीच्या प्रस्थापनेकरितां फरेंच लोकांनीं अत्यंत हालअपेष्टा सोसून १७८९ ते १७९२ पर्यंतच्या तीन वर्षांत जी राज्यक्रांति घडवून आणली ती युरोपांतील इतर राष्ट्रांवर जुलुमी सत्ता गाजविणाऱ्या सत्ताधाऱ्यांना शल्यासारखी सलूं लागल्यामुळें त्यांनीं फरान्सविरुद्ध आपली एकजूट केली. आणि ऑस्ट्रिया, प्रशिया, रशिया व इंग्लंड या चौकडीनें आपल्या तरवारीच्या जोरावर नेपोलियनला फरान्समधून हुसकून लावून फरेंच लोकांना अत्यंत अप्रिय झालेल्या बुर्बोन घराण्यांतील अठराव्या लुईची फरान्सच्या गादीवर परत स्थापना केली. आणि त्याच्याविरुद्ध फरेंच जनतेनें बिलकूल हालचाल करूं नये म्हणून आपलें बरेंचसें लष्कर फरेंचांच्या खर्चानें खुद्द पारीस शहरांतच ठेवून दिलें.

या लष्करी अंमलाच्या जाचांत फरेंचांनीं दोन तीन वर्षें अगदीं बिलकूल हालचाल न करतां सर्व जुलूम निमूटपणें सोसला. हें पाहून परकीय सैन्य पारीसमधून हलविण्यांत आलें. पुढें लवकरच म्हणजे इ. स. १८२४ सालीं हा अठरावा लुई मृत्यु पावला, आणि याचे मागून दहावा चार्लस गादीवर आला. या राजानें स्वतः पूर्वीची राज्यक्रांति पाहिली नसल्यानें व

तिचें दुःख अनुभविलें नसल्यानें गादीवर बसतांच सत्तेच्या तोऱ्यांत झारशाहीला प्रारंभ केला ! राज्यक्रांतीच्या वेळीं हद्दपार केले गेलेले धर्मोपाध्याय याच्याभोंवतीं गोळा झाले व त्यांच्या सांगण्यावरून त्यानें धर्मलंडपणाचें आचरण करणाराचा हात तोडून टाकण्याची रानटी शिक्षा पुनः नव्या कायद्यानें चालू केली. स्वतःच्या चैनीच्या खर्चाला अडचण पडूं नये म्हणून सरकारी खर्च कमी करण्यासाठीं सरकारी कर्जावरील व्याजाचा दर ५ टक्के होता तो ३ टक्के करून सर्व व्यापारी वर्गांत असंतोषाचें बीं पेरून ठेविलें. जुन्या राज्यक्रांतीच्या वेळच्या कायद्यानें सर्व मुलांना वारसा हक्क सारखाच ठेवला होता; पण तो कायदा वदलून पुनः वडील मुलाला विशेष हक्क देण्याचा कायदा करण्यांत आला आणि सर्वांत विशेष चीड येण्यासारखी गोष्ट ही कीं, पूर्वींच्या राज्यक्रांतीच्या वेळीं ज्या देशद्रोही इसमांच्या इस्टेटी सरकारजमा झाल्या होत्या त्यांना नुकसानभरपाई म्हणून ६० कोटी रुपये देण्याचा ठराव करण्यांत आला !

अशा रीतीनें सर्व राष्ट्रभर असंतोषाचा अग्नि धुमसूं लागला असतां १८२७ सालीं जुनें पार्लमेंट बरखास्त करून नवीन निवडणूक करण्याचा हुकूम देण्यांत आला. राजाचा अंमल जरी असा अनियंत्रित चालला होता आणि प्रधानमंडळावर पार्लमेंटची सत्ता बिलकुल चालत नव्हती तरी फरेंच मतदारांनीं पार्लमेंटच्या निवडणुकीवर बहिष्कार घालण्याचें कधींहि मनांत आणलें नाहीं. राजानें जुनें पार्लमेंट बरखास्त करतांच फरेंच मतदारांनीं निवडणुकींत राजविरोधी प्रतिनिधि पूर्वींहून अधिक येतील अशीच खटपट केली; आणि नव्या पार्लमेंटांत हुजूरपक्षाची मंडळी अगदींच थोडी निवडून आली. या वेळेपासून राजपक्ष व लोकपक्ष यांत उघड उघड घासाघीस सुरू झाली. राजानें जुनें लोकपक्षीय मंत्रिमंडळ मोडून नवें लोकविरोधी मंत्रिमंडळ नेमलें. त्या मंत्रिमंडळावर आपला विश्वास नाहीं असा पार्लमेंटनें ठराव केला. आणि राजास नवें लोकपक्षीय मंत्रिमंडळ नेमण्याची विनंति केली. ही विनंति राजास कळविण्यासाठीं जें शिष्टमंडळ राजाकडे गेलें होतें त्याचा राजानें अपमान केला; आणि पार्लमेंट जर आपली वर्तणूक न सुधारेल तर पार्लमेंट पुनः बरखास्त करीन अशी धमकी दिली ! आणि सहा महिनेपर्यंत पार्लमेंटची बैठक तहकूब केली.

असल्या झारशाही कृत्यांमुळें जनतेंतल्या असंतोषाचा वणवा अधिकाधिक भडकत चालला. तरी पण राजा चार्लस व त्याचे मंत्री यांना असेंच वाटत होतें कीं, दडपशाहीचा वेताळ मोकळा सोडला असतां त्याच्या दहशतीनें लोकपक्ष नरम येईल, आणि नवी निवडणूक केल्यास ती आपल्याला अनुकूल अशीच होईल. या समजुतीनें राजानें १८३० च्या मार्च महिन्यांत पार्लमेंट बरखास्त केलें आणि १८३० च्या जून महिन्यांत नवी निवडणूक झाली. त्या वेळीं 'नवा जुन्यास बरा म्हणवितो' या म्हणीचा राजास प्रत्यय आला. राजपक्षाच्या प्रतिनिधींची संख्या आणखी ५० नीं घटली, आणि लोकपक्षाचें बळ तेवढ्या संख्येनें अधिक वाढलें. अशा रीतीनें हा निवडणुकीचा डाव आपल्यावरच उलटलेला पाहतांच राजा चार्लस व त्याचे जुलुमी सल्लागार यांनीं जनलज्जा व मनलज्जा यांना सोडचिठ्ठी देऊन झारशाहीवर ताण करण्याचा विचार केला.

दडपशाहीची पहिली गदा वर्तमानपत्रांवर उगारली गेली. जुलुमी राजांची सर्वत्र अशीच समजूत असते कीं हीं खाष्ट वर्तमानपत्रेंच आगलावेपणाचें काम करतात, म्हणूनच जनतेंत असंतोष पसरतो; आणि वर्तमानपत्रांची एकदां मुस्कटदाबी केली कीं मग आपण कसाहि नंगा नाच घातला तरी लोक तो निमूटपणें सोसतील ! पण ही समजूत आजपर्यंत कोठेंच खरी ठरली नाहीं, मग ती फरान्समध्यें तरी कशी खरी ठरणार ? चार्लसनें पहिलें फर्मान असें काढलें कीं, सरकारी परवान्याशिवाय कोणतेंहि वृत्तपत्र प्रसिद्ध करूं नये. दुसऱ्या फर्मानानें नवें पार्लमेंट भरण्यापूर्वींच तें बरखास्त करण्यांत आलें ! आणि तिसऱ्या फर्मानानें मतदारांच्या लायकीची मर्यादा वाढवून मतदारांची संख्या संकुचित करण्यांत आली; प्रत्यक्ष निवडणुकीच्या ऐवजीं अप्रत्यक्ष निवडणुकी व्हाव्या असें ठरविण्यांत आलें आणि पार्लमेंटपुढें कोणतेंहि बिल यावयाचें झाल्यास तें सरकारपक्षामार्फतच आलें पाहिजे असें जाहीर करून प्रतिनिधींच्या हक्काचीहि सपशेल खच्ची केली !

ता. २६ जुलै १८३० इसवी रोजीं हे तीन वटहुकूम फरान्समध्यें सर्वत्र प्रसिद्ध झाले आणि फरेंच लोकांनीं व विशेषतः पारीस शहरांतील नागरिकांनीं या जुलुमाविरुद्ध झगडण्यास कंबर बांधली. 'नॅशनल' नांवाच्या वृत्तपत्राचा संपादक थायर्स याच्या अध्यक्षतेखालीं वर्तमानपत्रकारांची परिषद भरून

सरकारी वटहुकूम बेकायदेशीर आहेत सबब ते आपण मानणार नाहीं असा ठराव करण्यांत आला; आणि दुसऱ्या ठरावानें पार्लमेंटच्या सभासदांना अशी विनंति करण्यांत आली कीं, राजानें बेकायदा वटहुकूम काढून जरी पार्लमेंट मोडून टाकलें आहे तरी पार्लमेंटनें तो वटहुकूम न पाळतां आपली बैठक भरवावी आणि आपलें कायदेमंडळाचें काम चालू करावें. अशा प्रकारें ठराव करून लोकपक्षानें राजपक्षाच्या दडपशाहीला खरमरीत उत्तर दिलें. सरकारी परवाना न घेतां कित्येक वर्तमानपत्रें प्रसिद्ध होऊं लागलीं; परंतु कायदेमंडळाच्या सभासदांना मात्र आपली बैठक भरविण्याचें धैर्य होईना.

अशा आणीबाणीच्या वेळीं पारीस शहरांतील रिपब्लिकन पक्षाचे कित्येक पुढारी पुढें सरसावले आणि त्यांनीं या झारशाहीशीं उघड झुंज सुरू केली. अठरावा लुई गादीवर आल्यापासून या रिपब्लिकन पक्षाला आपली चळवळ उघड रीतीनें चालविणें अशक्य झालें होतें. तरी पण रिपब्लिकन पक्षाच्या गुप्त संस्था ठिकठिकाणीं असून त्या शक्य ती कामगिरी करीत राहिल्या होत्या. अशा गुप्त संस्थांना पुढें येण्याला ही पर्वणी चांगलीच लाभली. त्या संस्थांनीं मजूरवर्ग, विद्यार्थी आणि मध्यम वर्गांतील तरुण मंडळी यांना हातीं घेऊन झारशाहीला उघड तोंड देण्याचें ठरविलें. सरकारी परवान्याशिवाय वर्तमानपत्रें छापण्याची सर्वांसच मनाई झाल्यामुळें जे कित्येक छापखाने बंद पडले होते त्या छापखान्यांतील सगळा कामकरी वर्ग ता. २७ जुलै रोजीं बेकार होऊन रस्त्यांतून भटकूं लागला, आणि त्याचे पोलिसांशीं खटके उडूं लागले. बेकार कामकरी आणि बेफाम पोलिस यांची घासाघीस सुरू होतांच राज्यक्रांतीची पहिली ठिणगी पडली, आणि पारीस शहरांतील परिस्थिति वणवा पेटण्याला सर्वस्वीं अनुकूल असल्यामुळें त्या ठिणगीनें पेटलेल्या अग्नीच्या ज्वाला ताबडतोब सर्व शहरभर पसरल्या.

पारीस शहरांतील दंग्याचें वृत्त कानीं पडतांच अमेरिकेच्या स्वातंत्र्ययुद्धांत फ्रेंच सैनिकांचें आधिपत्य ज्याच्याकडे होतें तो वृद्ध लाफायटी धांवतच पारीसला आला, आणि त्यानें तरुण स्वयंसैनिकांचें आधिपत्य स्वीकारलें. मंगळवार ता. २७ जुलै रोजीं रात्रीं नॅशनल वृत्तपत्राच्या कचेरींत प्रमुख पुढाऱ्यांची सभा भरली. तींत थायर्स व लाफायटी यांच्यांत खटका उडाला. थायर्स

हा सनदशीर मार्गानें झारशाहीचा प्रतिकार करावा असें म्हणणाऱ्या पक्षाचा पुढारी होता.. पण त्या पक्षाचें बहुमत न होतां उघड सशस्त्र प्रतिकार करावा असें म्हणणाऱ्या लाफायटीच्या पक्षाचेंच त्या सभेंत बहुमत झालें, आणि थायर्स हा पारीस सोडून निघून गेला, व पारीस शहराचें पुढारीपण लाफायटी-कडे आलें.

बुधवार ता. २९ रोजीं लाफायटीनें पारीस शहरांत जेवढीं हत्यारें मिळ-ण्याचीं ठिकाणें होतीं तेवढीं काबीज करून आपल्या अनुयायांना सज्ज केलें, आणि लहानसहान बोळांच्या तोंडांशीं मोर्चे बांधून आपल्या स्वयंसैनिकांच्या बचावाची तजवीज केली. शहरांतील बंडखोरांची संख्या एकसारखी फुगत चालली; व त्यांनीं हॉटेल डी व्हिले ही आपल्या छावणीची जागा ठरवून तिच्यावर लोकशाहीचें तिरंगी निशाण चढविलें. हें सर्व वर्तमान राजास कळतांच त्यानें मारमॉंट यास सैन्यासह पाचारण केलें व मारमॉंटनें राजवाड्याच्या बचावार्थ कांहीं सैन्य ठेवून बंडखोरांना हॉटेल डी व्हिले येथून हुसकून लावलें. परंतु जेथें सगळें पारीस शहरच राजाविरुद्ध उठलें तेथें एकादें ठाणें काबीज करून काय होणार ? मारमॉंटला देखील एकंदरींत लक्षण ठीक दिसेना, तेव्हां त्यानें राजास आपले वटहुकूम रद्द करण्याचा सल्ला दिला. पार्लमेंटच्या प्रतिनिधीकडूनहि राजाकडे तसाच निरोप आला. पण राजानें सैन्याची जमवाजमव करून बंडखोरांची खोड मोडण्याविषयीं मारमॉंटला सक्तीचे हुकूम दिले.

मारमॉंटनें सैन्य जमवून पारीस शहर कह्यांत आणण्याचा प्रयत्न केला. परंतु आतां लष्करांतच दुमत दिसूं लागलें. कित्येक पलटणींनीं बंडखोरांवर चालून जाण्याचें नाकारलें. इतर कांहीं पलटणी तर उघडपणें बंडखोरांस जाऊन मिळूं लागल्या. कोणत्या पलटणीवर विश्वास ठेवावा हेंच मारमॉंटला कळेनासें होऊन तो गोंधळून गेला. त्यानें राजाला पुनः असाच सल्ला दिला कीं, सगळे वटहुकूम परत घेऊन पार्लमेंटची बैठक बोलाविली तरच निभाव लागेल. इतक्या पल्ल्यावर गोष्टी आल्यावर राजाच्या डोळ्यावरची धुंदी उतरली. त्यानें पार्लमेंट बोलावण्याचें मनाशीं ठरविलें, आणि तसा लेखी हुकूम दिला व तो दुसरे दिवशीं सकाळीं प्रसिद्ध करण्याचें ठरलें. पण योग्य वेळ निघून गेली होती. ता. २९ जुलै रोजीं रात्रींच बंडखोरांतील

कांहीं पुढाऱ्यांनीं ड्यूक ऑफ आर्लीन्सशीं संधान बांधलें आणि त्याच्याकडून सनदशीर रीतीनें राज्य करण्याचें वचन घेऊन त्याच्या नांवानें द्वाही फिरविण्याचें ठरविलें.

चार्लस राजाला दुसऱ्या दिवशीं सकाळीं हें वृत्त कळतांच त्याला पश्चात्ताप झाला. परंतु तो पश्चात्तापच ! त्याचा आतां उपयोग काय ? राज्यत्याग केल्याविना गत्यंतर नाहीं असें पाहतांच त्यानें आपला व आपल्या वडील मुलाचा राज्यावरचा वारसा सोडल्याचा राजीनामा खरडला, व तो स्कॉटलंडला निघून गेला. ता. ३ ऑगस्टला हा राजीनामा प्रसिद्ध झाला; आणि ता. ७ ऑगस्टला पार्लमेंटची बैठक होऊन लुई फिलिपी ऊर्फ ड्यूक ऑफ आर्लीन्स यास रीतसर राज्यपद देण्यांत आलें. अशा रीतीनें ता. २६ जुलै ते ता. ७ ऑगस्टपर्यंतच्या तेरा दिवसांत ही राज्यक्रांति अथपासून इतिपर्यंत संपूर्ण झाली. पण राज्यक्रांतीचा खरा झगडा काय तो ता. २७, २८ व २९ या तीन दिवसांतच झाला. आणि एवढ्या अल्पावधींत आणि एकट्या पारीस शहरानें ही राज्यक्रांति घडवून आणली. असंतोषाच्या घुशी लागून राजसत्तेची इमारत सगळीकडून पोखरली गेल्यावर क्षुल्लक धक्क्यानेंदेखील ती कशी एकदम ढांसळते याचें हें फरान्सच्या इतिहासांतलें शंभर वर्षांपूर्वीचें उदाहरण इतिहासाच्या वाचकांस काय शिकवितें बरें ?

---

लेख सोळावा

# संग्राहक व संशोधक मंडळ

'मराठी रियासत' या पुस्तकाच्या परीक्षणांत सरदेसाई, पोतदार व भारत इ. सं. मंडळ यांच्यासंबंधानें केसरींत लेख आला होता. त्याला उत्तर म्हणून पोतदार यांचीं दोन पत्रें आम्हीं छापलीं. हीं दोनहि पत्रें

कांहीं अंशीं केसरीला उद्देशून लिहिलेलीं असल्यामुळें त्यांतील एका मुद्द्या-संबंधानें दोन शब्द लिहावेसे वाटतात.

पोतदार यांच्या दुसऱ्या पत्रांत त्यांनीं 'ऐतिहासिक शोध' हा शब्द मोघम वापरला आहे. पण त्याचे जे अनेक अर्थ मनांत येतात त्यांची फोड न करतां पोतदार यांनीं त्यांचा घोटाळा केला आहे. शोधाचे तीन अर्थ त्याच्या तीन प्रकारांमुळें होतात. (१) शोधांतील सिद्धांतरूप गोष्ट. (२) सिद्धांत-समर्थनपर आधारांचा मुद्देसूद उतारा किंवा उतारे. (३) सर्व आधारांचा उपयोग करून, सर्व उतारे गोंवून सिद्धांताचें प्रतिपादन केलेला सबंध प्रबंध.

## वादाचा खरा मुद्दा

आतां सरदेसाई यांनीं काय मागितलें, पोतदारांनीं काय दिलें, काय दिलें नाहीं याविषयीं केसरीनें जी चर्चा केली, ती यांतील कोणत्या अर्थाला उद्देशून हें पाहूं. बहुतेक शोधकांची प्रवृत्ति आपला शोध गुप्त राखण्याकडे असते असें पोतदार म्हणतात. आम्हांला तसें वाटत नाहीं. निदान असल्या गुप्त राखलेल्या शोधासंबंधानें सरदेसाई यांनीं पोतदार यांचेजवळ कांहीं मागितलें नव्हतें. का. कृ. लेले यांना आपला शोध, म्हणजे सिद्धांत गुप्त ठेवावयाचा असता तर त्यांनीं तो निबंधांत प्रतिपादून मंडळाच्या सभेपुढें वाचला जाण्यास पाठविलाच नसता. अर्थात् वाद आहे तो लेखरूपानें प्रकट करून मंडळापुढें जाहीर रीतीनें वाचलेल्या निबंधापुरताच आहे. सरदेसाई हे पोतदार यांचेकडे जें काय मागत होते ती, हा निबंध वाचून झाल्यावर तो फिरून व्यक्तिशः वाचण्याची व त्यांतील सिद्धांत व तत्समर्थनपर एकाद-दुसरा उतारा–अवतरण आभारप्रदर्शनपूर्वक घेण्याची परवानगी. सबंध निबंधच्या निबंध आपल्या रियासतीच्या बुकांत घालण्याची परवानगी त्यांनीं मागितली नव्हती. म्हणून मागितलेली मर्यादित उपयोगाची परवानगी पोतदार यांनीं दिली असती तर कांहीं विशेष बिघडलें असतें कीं काय इतकाच प्रश्न !

सिद्धांतरूप शोध प्रकट झालाच होता. तेव्हां त्याची आठवण राहील तशी मनानें किंवा वेळच्या वेळीं म्हणजे निबंध वाचला जात असतां केलेल्या टिपणांच्या साहाय्यानें, तो आपल्या पुस्तकांत घालण्यास सरदेसाई यांना

काय प्रत्यवाय होता ? किंवा कोण प्रतिबंध करणार होतें ? दुसरे पक्षीं सबंध निबंध उतरून घेऊन तो आपल्या पुस्तकांत घालण्याची परवानगी सरदेसाई यांनीं मागितली नव्हती. यामुळें 'कॉपीराईट'चा भंग होण्याचा संभव नव्हता. शिवाय, सरदेसाई यांनीं मर्यादित उपयोग केल्यावर पुढें केव्हांहि आपल्या सवडीनें, इतिहासमंडळानें रा. लेले यांचा निबंध सबंध जशाचा तसा आपल्या त्रैमासिकांत छापला असता तरी त्याचें अविकृत स्वरूप व महत्त्व जसेंच्या तसें शिल्लक राहिलें असतें. त्यांत कांहीं उणेपणा आला नसता. मंडळाचें हें पुस्तक सरदेसाई यांच्या पुस्तकाच्या आधीं प्रसिद्ध झालें असतें तर प्रश्नच नव्हता. सरदेसाई यांनीं केलेला उपयोगच नंतरचा म्हणून उष्टा ठरला असता. पण याच्या उलट असें समजूं कीं, सरदेसाई यांचें पुस्तक आधीं प्रसिद्ध झालें असतें तर तीं या शोधाची जाहिरातच झाली असती ! आणि रा. लेले यांच्या सिद्धांताचें बीजरूप वाक्य व तत्समर्थनपर एकादें अवतरण घेतल्यानें, सबंध निबंधाचें काम भागणें शक्य नाहीं म्हणून, मंडळाच्या प्रकाशनाचा ताजेपणा अबाधित राहिला असता.

## चतुर व उदार संशोधक

आपले शोध गुप्त ठेवणाऱ्या संशोधकांचा या वादांत पोतदारांनीं जो संबंध आणला आहे तो आमच्या मतें व्यर्थ होय ! पोतदारांनीं काढलेल्या बारीक श्लेषाप्रमाणें रा. लेले हे 'चतुर' म्हणजे 'गूढप्रिय' संशोधक असते, तर आपला शोध त्यांनीं मंडळापुढें निबंधरूपानें जाहीर केलाच नसता. म्हणून ते 'उदार' संशोधकांच्या वर्गांतच पडतात असें आम्हांला वाटतें. आपल्या निबंधाला 'कॉपी-राईट' चें स्वरूप ठेवण्याची रा. लेले यांची इच्छा होती असें आम्हांला वाटत नाहीं. वाटल्यास खरें खोटें हें रा. लेले यांनाच कोणींहि विचारून पाहावें. त्यांना आपला निबंध स्वतः वेगळा छापवून कांहीं द्रव्यलाभ होण्याचा नव्हता. शोधविषयक कीर्ति व प्रसिद्धि आधींच मिळाली होती ! बरें, मंडळाच्या त्रैमासिकांतून मागाहून तो प्रसिद्ध झाला असता तरी संशोधक या नात्यानें त्यांची अब्रू किंवा मंडळाच्या संबंधानें त्यांना येणारें महत्त्वहि कमी झालें नसतें. उलट मंडळाच्या त्रैमासिकाच्या निघणाऱ्या

प्रती व त्याच्या वाचकांची संख्या लक्षांत घेतां, सरदेसायांच्या पुस्तकांतून आपल्या शोधाला मिळणारी प्रसिद्धि रा. लेले यांना इष्टच वाटली असती.

आणि याच एका उदाहरणावरून आम्ही आणखी एक व्यापक सिद्धांत मांडण्याचें थोडेंसें धारिष्ट करूं इच्छितों. तो असा कीं, ज्या गूढप्रिय संशोधकांना ' चतुर ' असें नांव पोतदार देतात त्यांची चतुराई प्रायः निष्फळ ठरते. किंवा ती साधल्यास जनतेची हानि होते. उलट, ज्या संशोधकांना पोतदार हे वरून ' उदार ' हें विशेषण लावतात (पण मनांतून सैल, भोळे, भंपक असें विशेषण बहुधा लावीत असतील) ते खरे सैल भोळेहि नसतात किंवा उदारहि नसतात. तर फक्त सरळ बुद्धीचे असतात. माकडानें गालफडांत लपवून ठेवलेल्या सुपारीसारखे आपले शोध ते गुप्त ठेवण्याचा प्रयत्न करीत नाहींत. कारण गालफडांत सुपारी आहे हें पाहणाराला वर दिसून येतच असतें. पोतदारांना वाटतें कीं, संशोधक हा गर्भवती स्त्रीप्रमाणें आपला गर्भ परिच्छिन्न गुप्त ठेवितो. पण आम्हाला तर वाटतें कीं, गर्भिणीला जर प्रसूतिवेदना एका ठराविक वेळीं होत असल्या, तर या गौप्य-प्रेमी म्हटल्या जाणाऱ्या संशोधकाला प्रसूतिवेदना गर्भधारणेपासूनच सुरू होतात. आणि त्या तो आपल्या कण्हण्याकुंथण्यानें किंवा आक्रोशानेंहि संधि सांपडेल तेथें प्रकट करीत असतो. म्हणजे आपल्या शोधाच्या आधारावर सांपडेल तेथें दुसऱ्या कोणा इतिहासकारावर टीका खंडन करतो किंवा त्याचें मंडन वा समर्थन करतो. आणि " चार्लस राजाचें कापलेलें डोकें जेथें तेथें पुढें यावयाचेंच " अशी जी एक इंग्रजी म्हण आहे त्याप्रमाणें, या संशोधकाचा शोध वेळीं अवेळीं पुढें येऊन कोणाच्या तरी डोक्यांत बसल्याशिवाय राहावयाचा नाहीं. ' चतुर ' संशोधकाविषयीं हें झालें. आणि ' उदार ' संशोधकहि खरोखर स्वार्थीच असतात. म्हणजे आपलें नांव घेऊन आपल्या शोधाचा उपयोग इतर कोणी जितका अधिक करील तितका तो त्यांना इष्टच वाटतो. या वृत्तीला स्वार्थी असें नांव आम्हीं दिलें तरी तें कमीपणाच्या बुद्धीनें नव्हे. स्वार्थ असला तरी तो प्राकृत नव्हे, सुसंस्कृत होय !

## यांत काय मंडळाचें खरें हित ?

या सर्व विवेचनाचें तात्पर्य हेंच कीं, रा. लेले यांचा या वादांतील निबंध

पाहण्याला व त्यांतील एकादा उतारा किंवा अवतरण (सबंध निबंध नव्हे) घेण्याला पोतदार यांनीं सरदेसाई यांना परवानगी दिली असती तर त्यांना रा. लेले यांनीं हरकत घेतली नसती. आतां ही परवानगी दिली नाहीं, ही गोष्ट पोतदार यांनीं संस्थेचें हित मनांत ठेवूनच केली असा ठराव कारभारी मंडळानें केला. पण तो औपचारिक असून आपल्या चिटणिसाचा बचाव करणें हें कारभारी मंडळाचें प्रायः कर्तव्यच ठरतें म्हणून तो तसा केला असेल. पण प्रत्यंतरादाखल कोणींहि असें उलट मनांत आणावें कीं, समजा, पोतदारांनीं सरदेसायांना ही परवानगी दिली असती, तर कारभारी मंडळानें त्यांच्या निषेधपर ठराव केला असता काय ? व कदाचित् रा. लेले यांनीं तक्रार केली असती तरीहि "पोतदारांचें करणें मंडळ-संस्थेच्या हिताच्या दृष्टीनें होतें" असाच तो ठराव झाला नसता काय ? यावरून या वादांत पोतदार यांनीं कारभारी मंडळाचा ठराव आणण्यांत फारसें स्वारस्य नाहीं. निदान आम्ही इतकें म्हणतों कीं, अशी परवानगी नाकारण्यापेक्षां ती दिल्यानेंच मंडळाची लोकप्रियता अधिक वाढण्याचा संभव आहे.

आतां संग्राहक व संशोधक मंडळें असा जो भेद पोतदार यांनीं केला आहे त्यासंबंधानें दोन शब्द लिहूं. संशोधकमंडळें व संग्राहकमंडळें असा भेद तात्त्विक रीतीनें करतां येतो हें खरें. परंतु हा भेद आळविण्यालाहि कांहीं मर्यादा आहेत. पण पोतदार त्या मानीत नाहींत असें दिसतें. भारत-इतिहास मंडळाला ते संशोधक मंडळ म्हणतात. पण या किंवा इतर एकाद्या मंडळाचा संबंध नसतां किती तरी संशोधन आजवर झालेलें आहे. शिवाय खुद्द या मंडळाच्या द्वारें झालेल्या प्रत्यक्ष संशोधनाच्या मानानें त्यांतला संग्रहच अधिक आहे. उलट ज्या पुण्याच्या दप्तराला फक्त संग्रहशाळा म्हणावें असा पोतदारांचा आग्रह, त्यांत झालेल्या संशोधनाचें फल व्हरनॅक्युलर ट्रॅन्सलेशन सोसायटीनें प्रसिद्ध केलेल्या पेशव्यांच्या डायऱ्यांतून दिसून येतें. किंवा समजा, उद्यां सरदेसाई यांनीं दप्तरखान्यांतील शोधून काढलेल्या व संशोधिलेल्या शेंकडो पत्रांचा ग्रंथ छापला तर तेंहि संशोधनच नव्हे काय ? कारण यांतील पुष्कळ कागदपत्रांच्या मित्या, तारखा, अर्थ सरदेसायांनीं व त्यांच्या साहाय्यकांनीं लावलेले असतील; व सरदेसायांनीं प्रस्तावना लिहिली तर कदाचित् त्यांची प्रकरणवार संगतीहि लावली जाईल. मग हें संशोधन नव्हे कसें ?

भा. इ. मंडळांतील सभासद लोकांच्या निरनिराळ्या घरचे कागद शोधून आणून त्यावर मखलाशी करतात, तर पुण्याच्या दप्तरांत असले कागद एकत्र एकदम पुष्कळच मिळतात व संशोधनाला सांपडतात इतकाच फरक. इतकेंच नव्हे तर हा संग्रह देखील मूळ झाला तो असेच निरनिराळ्या घरचे कागद मिळवून झालेला आहे.

## भा. इ. मंडळ शंकराचार्य नव्हे

संस्था या दृष्टीनें भा. इ. मंडळाला सरकारी पुणें दप्तराच्या मानानें आम्ही थोडी अधिक किंमत देण्यास केव्हांहि तयार आहों. परंतु मंडळ जर एकदम 'शंकराचार्य' बनूं पाहील, व निग्रहानुग्रहाचें प्रस्थ माजवील, तर कोणी तें फारसें चालूं देणार नाहीं हें मंडळानेंच ओळखलें पाहिजे. समजा, सरकारनें जर उद्यां आणखी चार इतिहासाभ्यासी लोक या दप्तरखान्यावर नेमले व इतिहासमंडळ दरसाल कांहीं पत्रें संशोधून छापतें तशीं स्वतः सरकारनें छापविण्याचें ठरविलें, तर या दप्तराला संग्राहक मंडळ न म्हणतां संशोधकमंडळच म्हणावें लागेल. भा. इ. मंडळांत जसे चार दोन लोक चर्चेला बसतात तसेच दप्तरांतहि बसतील. फरक इतकाच होईल कीं आपले सर्व कागद शोधून छापून होईपर्यंत हें दप्तर कोणास आंत येऊं देणार नाहीं किंवा आपले शोध बाहेर जाऊं देणार नाहीं. या दृष्टीनें ते 'चतुर' संशोधक ठरतील. पण भा. इ. मंडळाचा खाक्या अगदीं उलटा आहे. कारण संमेलन, वाढदिवस, पाक्षिक सभा यांच्या जाहिराती मंडळ आधीं देतें. कित्येक वेळां संशोधनाचे विषय आगाऊ जाहीर करतें. वाटेल त्या मनुष्याला हजर राहण्याची परवानगी असते. सर्वांपुढें संशोधनात्मक लेख वाचले जाऊन त्यांच्यावर चर्चा होते. व केव्हां केव्हां त्यांतला कांहीं भागहि वर्तमानपत्रांतून येतो. अर्थात् मंडळापुढें येणारे संशोधक पोतदारांच्या भाषेप्रमाणें 'चतुर' नसतात तर 'उदारच' असतात. त्यांना आपल्या शोधाचे विषय, सिद्धांत, अनुमानपद्धति व आधार हे जगजाहीरच करावयाचे असतात. निबंध प्रत्यक्ष शब्दशः छापून प्रसिद्ध होणें, न होणें, ही स्वतंत्र गोष्ट आहे. ती पुढें सोयीप्रमाणें घडते. परंतु त्याचा अर्थ असा नव्हे कीं, मंडळापुढें वाचलेला निबंध पुनः कोणी वाचा-

त्रयास मागूं नये, किंवा हौस वाटल्यास त्यांतून आधारभूत एखादें अवतरण किंवा उतारा त्यानें करून घेऊं नये.

आतां मान व कीर्ति यांच्या दृष्टीनें पाहूं. वरीलप्रमाणें उदार बुद्धीनें कोणाला उतारा अवतरण घेऊं दिल्यास मंडळाची अब्रू किंवा कीर्ति ही फैलावण्यास मदतच होईल. कारण जो त्याचा उपयोग करील तो मंडळाचा व निबंधकाराचा दोहोंचाहि उल्लेख करील. सरदेसाई काय किंवा इतर ग्रंथकार काय, तळटीपांत असे आधार नामनिर्देशपूर्वक देतातच. त्यांच्या सिद्धांतप्रतिपादनाला ते अवश्यच असतात. म्हणून असे उतारे, अवतरणें घेणारांना उपकारकर्ते मानून मंडळानें अगत्यवादानें मदतच केली पाहिजे. ज्यांतील उतारा अवतरण सरदेसायांनीं मागितलें तो निबंध केवळ संग्रहार्थ मंडळांत आला असता तर गोष्ट वेगळी. त्याची परिस्फुटता न करणें हेंच योग्य. पण जो कागद पांच पन्नास लोकांसमक्ष वाचून चिकित्सेला मांडला, त्यांतील उतारा अवतरण घेण्यानें काय बिघडलें ? एकाद्या स्त्रीनें उघड्या चौचाकींत बसून राजरस्त्यानें वाद्यें लावून मिरवीत जावें; आणि मग एकाद्यानें चेहऱ्याकडे जरा अधिक निरखून पाहिलें असतां "माझी पडदपोशी गेली" असा कांगावा तिनें करावा तसें या प्रकरणीं घडलें आहे. पण त्यानें मंडळाची अब्रू किंवा मान्यता वाढते किंवा संभाळली जाते असें वाटत नाहीं.

## मंडळाचें महत्त्व कशानें वाढेल ?

उलट इ. मंडळाचे अधिकारी त्याच्या शोध-संशोधनाची जितक्या तत्परतेनें परिस्फुटता करावी तितक्या तत्परतेनें ती करीत नाहींत असें आम्हांला तरी वाटतें. वास्तविक कोणत्याहि संशोधनाचें टिपण मंडळापुढें वाचलें गेल्या-बरोबर त्याची बित्तंबातमी इंग्रजी-मराठी वर्तमानपत्राचे नगारे लावून तावडतोब जाहीर केली जावी. असें झालें म्हणजे मग त्या ऐवजाची चोरी कोण करूं शकेल ? व कोणीं मंडळाचा उल्लेख न करतां त्याचा उपयोग केलाच, तर त्यावर टीका करणारांत एकादा माहितगार गुप्त पोलीस प्रायः लाभेलच. अशा नौबती-जाहिरातीनंतर जो कोणी त्या ऐवजाचा उपयोग करील तो अर्थात् 'उष्टेंच' खाईल. पण मंडळाची रीत अशी कीं, वाढलेलें ताट आपणहि खावयाचें नाहीं व लोकांनाहि खाऊं द्यावयाचें नाहीं. स्वतःला

भूक लागेल तेव्हां खाऊं असें म्हणून ठेवायचें, मग त्याकडे दुरून पाहात इकडे लोक उपाशी मेले तरी चालतील. आणि तें लोक मंडळानें उष्टें केलेलें अन्न, उष्टें म्हणून स्वीकारून खाण्याला तयार असले तरी देखील ! तात्पर्य, आमच्या मतें भा. इ. मंडळाच्या स्वतःच्या महत्त्वाच्या व स्वाभिमानाच्या कल्पना थोड्याशा विपरीत आहेत. त्या सुधारण्याची मुख्य युक्ति अशी कीं, आपल्या शोधांची प्रसिद्धि मंडळानें ताबडतोब करून चोरी होण्याचा संभव मुळांतच थांबवावा. संकलनकारांच्या साभार निर्देशानें संशोधनाला उणेपणा न येतां उलट मदतच होईल.

कवि व लेखक यांना जशी आपली कविता व लेख तसाच संशोधकाला आपला निबंध वाटतो हें पोतदारांचें म्हणणें कांहीं अंशीं ठीक आहे. पण कोणीहि कवि किंवा लेखक त्यानें होऊन जाहीर रीतीनें वाचलेल्या कवितेंतलें किंवा लेखांतलें अवतरण किंवा उतारा कोणी मागितला असतां तो खचित नाकारणार नाहीं. उलट आपला सन्मान झाला, जाहिरात झाली, असेंच मानतील. सरदेसायांना मंडळाबद्दल कदाचित् आपलेपणा वाटावा तसा वाटत नसेल. पण मंडळापुढें प्रथम प्रसिद्ध झालेल्या संशोधनात्मक निबंधाचा आधार जाहीर नामनिर्देशानें आपल्या ग्रंथांत त्यांनीं केला, तर निदान मंडळाचें महत्त्व किंवा श्रेष्ठता तरी ते कबूल करतात असेंच ठरेल कीं नाहीं ? कीर्ति, मान्यता यांच्या दृष्टीनें, सरदेसायांच्या या कबुलीनें मंडळाला त्यांच्या आपलेपणाच्या भावनेपेक्षांहि अधिक कृतकृत्यता वाटली पाहिजे.

---

## लेख सतरावा

# ऐतिहासिक परिशीलनाचे तीन टप्पे

[ भारत इतिहास संशोधक मंडळाचे २३ व्या वार्षिक संमेलन प्रसंगींचें अध्यक्षीय भाषण. ]

“ऐक्य व अखंडत्व यांच्या मर्यादा बऱ्याच विस्तृत असतात. सोयीकरितां इतिहासकार्य करणाऱ्या संस्था प्रादेशिक नांवें घेवोत तथापि इतिहासविजय हे परस्परांना इतके निगडित असतात कीं त्यांतील कोणासहि परका असें इतिहासाच्या अभ्यासकाला म्हणवतच नाहीं. अशा या उद्योगाच्या फलश्रुतीवर आक्षेप घेतले जातात त्यांतल्या कांहींना मीं गतवर्षीं उत्तर दिलें आहे. यंदा आणखी एक उत्तर असें कीं अगदीं नव्यांत नवीं सामाजिक व जागतिक मतें व सिद्धांत मांडणारांनाहि इतिहाससंशोधनाचा उपयोग होतो हें अलीकडे दिसून आलेलें आहे. इतिहासाचें परिशीलन तीन प्रकारांनीं मुख्यतः होतें. संशोधन, संकलन व सिद्धांतन. हा तिसरा शब्द मी नवा सुचवितों. पूर्वीं त्याचा निर्देश ‘ इतिहासाचें तत्त्वज्ञान ’ अशा लांबलचक नांवानें करण्यांत येत होता. पण शब्दांत सुटसुटीतपणा व अनुप्रासक्षमता असल्यानेंच तो रूढ होण्याला मदत होते. माझ्या मतें संशोधन, संकलन व सिद्धांतन हे शब्द उच्चारले म्हणजे इतिहास विषयाच्या परिशीलनाचें सर्व कार्य त्यांत समाविष्ट होईल.

### ज्ञान, शहाणपण व बळ

या विषयाची फलश्रुति पुन्हा सांगावयाची तर हीच कीं, मनुष्याला या अभ्यासानें ज्ञान तर भरपूर मिळतेंच मिळतें. त्यांतून शहाणपण काढणें हें मनुष्याच्या बुद्धीच्या पात्रतेवर असतें आणि शहाणपण असलें तरी त्यापासून बळ निर्माण होणें हें बरेंचसें परिस्थितीवर अवलंबून असतें हें कबूल केलें पाहिजे. इतिहासाच्या फलश्रुतींत ज्ञान, शहाणपण व बळ हीं तीनहि येऊं शकतात. मात्र ज्ञान म्हणजे शहाणपण नव्हे आणि शहाणपण म्हणजे बळ नव्हे ही गोष्ट ऐतिहासिक उदाहरणें देऊनच सिद्ध करण्यासारखी आहे.

प्रवृत्तिपर मनुष्य या तीनहि फलांची अपेक्षा करतो. निवृत्तिपर मनुष्य कदाचित् ज्ञान व तत्त्वज्ञान या फलांवरच संतुष्ट राहतो. पैकीं ऐतिहासिक ज्ञान सुलभ व समृद्ध करणें हें मुख्यतः संशोधकांचें काम आहे. सोन्याचा एकेक कण किंवा रत्नाच्या जातीचा एक एक दगड सुटा सुटाच मिळतो. तो हुकमी न मिळतां पुष्कळसा संशोधनबुद्धि ठेवणाराला यदृच्छेनें मिळतो व त्याच कारणाकरितां तो या संशोधनांत प्रादेशिक मर्यादा न मानतां आणि स्थळ व काळ यांचा कृपण संकोच न करितां आपली बुद्धि सर्व जगभर फिरवितो आणि मग त्याचें श्रेय द्यावयाचें तर तें फार तर प्रादेशिक संस्थेला देतो. हें संशोधनाचें काम पुष्कळसें एकांडे शिलेदारी पद्धतीनें होत असतें.

## व्यक्ति-प्रतिभेला वाव

परंतु यापुढील संकलनाचें काम हें श्रमविभाग व सहकारिता या पद्धतीनें होतें व पश्चिमेकडील देशांत इतिहासपरिशीलनाचें जें प्रचंड कार्य होत आहे तें या पद्धतीनेंच केलें जातें म्हणून तसें होतें. केंब्रिज हिस्टरी हें संकलनाचें एक उत्तम उदाहरण म्हणून मी देईन. कारण त्यांत किती तरी बुद्धिमान लोकांनीं सहकारितेनें व श्रमविभागानें तत्पूर्वी झालेल्या प्रचंड संशोधनाचें चीज केलें आहे. यानंतरचें काम सिद्धांतनाचें. येथें मात्र फिरून एकांडे शिलेदारी पद्धतीच प्रभावी होते. कारण उपपत्ति बनविणें व संशोधन करणें या गोष्टी पुष्कळशा व्यक्तिप्रतिभेलाच वश असतात. बुद्धिकार्य हें सामुदायिक होऊं शकतें. प्रतिभेचें कार्य हें तसें होऊं शकत नाहीं. मी स्वतः ज्ञान, शहाणपण व बळ या तिन्ही इतिहासफळांना सारखेंच महत्त्व देतों; त्याप्रमाणेंच संकलनाच्या उद्योगधंद्यालाहि संशोधन व सिद्धांतन यांच्याइतकेंच महत्त्व देतों. सामान्य माणसाच्या दृष्टीनें संकलन हें अत्यंत उपयुक्त असतें. हीं तीन महत्त्वाचीं कार्यें बहुधा आळीपाळीनें एकामागून एक अशींच होऊं शकतात. एकदां सर्व नुसतेंच्या नुसतें संशोधन किंवा नुसतेंच्या नुसतें संकलन किंवा सिद्धांतन होऊं शकत नाहीं.

## तिहींचा परस्पर संबंध

या तिहींत मिळून एक प्रकारची तालबद्धता असते असेंहि म्हणतां येईल.

संगीतांत जसे ताल, टाळी व सम या गोष्टी क्रमानें येऊन तालाचें आवर्तन पुरें करितात त्याचप्रमाणें संशोधन, संकलन व सिद्धांतन, हींदेखील पुष्कळशीं क्रमानेंच अवतीर्ण होऊन इतिहासपरिशीलनाचें कार्य पुरें करतात. भौतिक शास्त्राचा अभ्यास व इतिहासाचा अभ्यास हीं दोन्ही सारख्याच स्वरूपाचीं आहेत. पैकीं त्यांच्या फुटकळ संशोधनाला खाण्याचें, संकलनाला पचविण्याचें व सिद्धांतनाला त्या अन्नाचे जीवनरस उत्पन्न करण्याचें कार्य अशीं नांवें देतां येतील. गुरें रानांत मोकळीं सुटल्यावर तीं उपजत बुद्धीनें कोणती वनस्पति चांगली व कोणती वाईट याचा निर्णय करतात, मग तीं नुसती ओरबाडून खातात, नंतर स्वस्थ बसून ते घांस पुनः पुनः तोंडांत आणून त्याचें चर्वण करतात. अशा या त्रिविध कार्यांत सकृद्दर्शनीं अभ्यासकाची नाउमेद होण्यासारखी एक गोष्ट आहे. ती अशी कीं, हें तिन्ही प्रकारचें कार्य अबाधित राहात नाहीं. कारण प्रत्यहीं नवें संशोधन होतें. कांहीं कालानें नवीन संकलन ग्रंथ होतात व या इतिहास–साधनांवरून सिद्धांताचेंहि परिवर्तन होऊं शकतें. यामुळें आपण करतों तें काम नश्वर आहे असें अभ्यासकाला पदोपदीं वाटतें. पण खरोखर तें नश्वर नसतें फक्त तात्पुरतें असतें. याचा अर्थ पूर्वींच्या कामापलीकडे ज्यांचा हात किंवा नजर पोंचली असे लोक आपल्या कार्यांत सहजच पूर्वींच्या लोकांपेक्षां पुढें गेलेले दिसतात व हीच प्रगति. तथापि ही प्रगति नश्वरतेचें लक्षण मानतां येत नाहीं. कारण तीनहि प्रकारचें जुनें कार्य पुढीलांना उपयोगी पडतें आणि इमारतीच्या खालखालच्या थरांच्या दगडांप्रमाणें एका अर्थानें स्थिरपदहि असतें. एका इंग्रज ग्रंथकारानें ही गोष्ट एका वाक्यांत फारच चांगली सांगितली आहे. तो म्हणतो, Historical studies are surpassed but not superseded हें तत्त्व घेतल्यास विनाकारण निराशा होण्याचें इतिहासाच्या अभ्यासकाला कारण नाहीं. मात्र त्याबरोबर हेंहि लक्षांत ठेवावें कीं, हें परिशीलनकार्य फाजील अहंकारानेंहि करणें व्यर्थ आहे. बाधित तत्त्वाची उपाधि ज्याला नाहीं असें कोणतें उपयुक्त कार्य या जगांत आहे? आणि तें तसें नाहीं म्हणून इतिहासाच्या अभ्यासाचें कार्य तसेंच समजून आनंदानें करीत राहावें हेंच भूषणावह व योग्य होय."

---

लेख अठरावा

# भारत इतिहास–संशोधक मंडळ

## २५ वा वाढदिवस

[ १ जुलै १९३५ रोजीं भारत इतिहाससंशोधक मंदिराचा २५ वा वाढदिवस साजरा झाला त्या प्रसंगींचें प्रास्ताविक भाषण. ]

मंडळाच्या ज्युबिलीचा वाढदिवस, खरें म्हटलें तर, गेल्या महिन्यांत भरविलेल्या अखिल भारतीय इतिहास परिषदेनेंच साजरा झाला आहे. या प्रसंगानें, मंडळाच्या कामगिरीची खरी कल्पना येऊन, परप्रांतीय इतिहास-भक्त आश्चर्यचकित झाले व त्यांनीं अकल्पित रीतीनें मंडळाविषयीं धन्योद्-गार काढलेले पाहून मला फार आनंद झाला. या प्रसंगानें असेंहि दिसून आलें कीं, कित्येकांना निरुपयोगी वाटणारें असें इतिहाससंशोधनाचें काम करणारे मंडळासारखे वेडे पीर हिंदुस्थानांत इतरहि पुष्कळ आहेत. या निंदकांच्या मतें देशाला आज संस्कृतिवर्धन नको. त्यांतल्या त्यांत इतिहास-संशोधन हा वेळेचा अपव्यय असून, देशाचें खरें पाऊल पुढें पडावयाचें तर उद्योगधंदे वाढविल्यानेंच पडेल. उद्यां कोणी शिवाजी महाराजांची अस्सल भवानी तरवार शोधून काढून प्रदर्शनांत ठेवली तर हे निंदक म्हणणार 'त्याऐवजीं एकादी लोहारी ऐरण व त्यावर हातोडा या वस्तू अधिक प्रदर्शनीय होतील.' अशांना शिवाजी महाराजांच्या हस्ताक्षराचा शोध क्षुद्रच वाटणार.

## ज्ञानांत ज्ञानाची भर

पण औद्योगिक प्रगति सिद्ध केलेल्या राष्ट्रांतूनहि इतिहाससंशोधन किती जिव्हाळ्याचें मानलें जातें याचें एक उदाहरण हें कीं, आज दोन हजार वर्षां-पूर्वींच्या एका कागदावरून तें येशू ख्रिस्ताचें हस्ताक्षर आहे कीं नाहीं याचा वाद सुरू आहे ! शिवाजीच्या घरीं बालपणींच राज्यकारभाराचा आखाडा सुरू होता. कारकून-फड काम करीत होता. त्याला स्वतःला शिक्षण देण्याकरितां शिक्षक ठेवले होते. तत्कालीन बालशिक्षणाचा निम्मा-

अधिक भाग हस्ताक्षर हाच होता. या गोष्टी लक्षांत घेतां शिवाजीला साधी सही करतां येत नव्हती हें म्हणणेंच हास्यास्पद वाटतें. मग प्रत्यक्ष त्याच्या सहीचा कागद मिळत नाहीं या अभावरूप कारणावरून कोणी कितीहि अनुमानें रचीना ? उलटपक्षीं येशू ख्रिस्ताचा जन्म सुताराच्या घरीं झाला, व त्याचें बालपण व पौगंडावस्था मासे मारणाऱ्या कोळ्यांच्या समाजांत गेली, यामुळें ख्रिस्त निरक्षर होता हें अनुमान शोभेल तरी. तथापि, मीं आतां सांगितल्याप्रमाणें संशोधन सुरू आहे. मग अशा संशोधनाची फल-श्रुति तरी काय ? अर्थात् विशिष्ट प्रकारचें ज्ञान. शिवाजी निरक्षर ठरला तरी त्यानें केलेला हिंदवी स्वराज्यस्थापनेचा पराक्रम सिद्ध आहे, तो कोणी काढून घेऊं शकत नाहीं. तसेंच शिवाजीचें स्वराज्य नष्ट झालें तरी ख्रिस्तानें स्थापलेला धर्म आज जगभर चालत असून वाढत आहे. या त्याच्या पराक्रमा-पुढें त्याच्या साक्षरतेला काय महत्त्व ? पण ज्ञानांत ज्ञानाची भर ही केव्हांहि स्पृहणीयच वाटली गेली आहे.

## काळाशीं त्रिखंडात्मक संबंध

ज्ञानानंद हा मिळेल तितका लुटावासाच वाटतो; आणि फिरून हें ज्ञानहि हातून निघून गेलेल्या काळांतील. काळ हा त्रिखंड आहे. आणि तीनहि काळांशीं मनुष्याची एकेक विशेष मनोवृत्ति निगडित झालेली आहे. त्याचा सर्व अभिमान गत काळांत सांठविलेला आणि त्याची सर्व आशा भविष्य काळांत साठविलेली असते. वर्तमान काळ हा सुखदु:खात्मक मिश्र अनुभव घेण्याचा, भोगाचा व प्रत्यक्ष म्हणून कल्पना-रम्यत्व-शून्य असा त्याला वाटतो. आपल्याविषयीं गतकालाचें ज्ञान अनेक पूर्वजन्मांसंबंधीं मिळालें तरी माणसाला हवें असतें. तसेंच पुढल्या जन्माचें निदान. भृगु संहितेंतील आपल्या कुंडलीचें मागील पुढील वर्णन वाचल्यानें केवळ निष्फळ ज्ञानाशिवाय कोणाला काय अधिक लाभ होतो ? परंतु तें टिपण लिहून घेण्याकरितां शेंकडों-हजारों रुपये कित्येक लोक खर्चतात. या ज्ञानानंदाची उपपत्ति अशी वाटते कीं, जगांत जें जें म्हणून दुर्मिळ, तेंच मनुष्याला अधिक प्रिय असतें. ऐतिहासिक संशोधनानें मिळणारें ज्ञान दुर्मिळ म्हणूनच, इतिहाससंशोधन हा पराक्रम ठरतो. पाऊस ओसरल्यावर गटारांत बारीक नजरेनें न्याहाळीत हिंडणाऱ्या

भिकाऱ्याला सोन्याचा एक कण सांपडल्यानें जो आनंद होतो, तो बँकेच्या तळघरांत शुद्ध सोनें म्हणून छाप मारलेल्या अस्सल सोन्याच्या लगडीच्या लगडी व चिपाच्या चिपा हाताळणाऱ्या सराफाला होऊं शकत नाहीं.

## निष्काम कर्मयोग

मनुष्याप्रमाणें समाजालाहि गतकालीन पूर्वजन्म व भविष्यकालीन पुनर्जन्म असतातच. त्याच्याहि ज्ञानाची गोष्ट अशीच आहे. म्हणजे तें कणशः मिळतें आणि त्याचें ओझरतें दर्शन होतें म्हणूनच तें प्रिय असतें. आणि म्हणूनच इतिहाससंशोधनाला निष्काम असा कर्मयोग म्हणतां येईल. कारण त्यांत कर्मफलावर आसक्ति नाहीं. करमणुकीचे किंवा ज्ञानार्जनाचे अनेक प्रकार असे असतात कीं, त्यांत क्रिया करण्यांतच आनंद असतो, फलप्राप्तींत नसतोहि. या दृष्टीनें हेंहि लक्षांत ठेवावें कीं अशा ज्ञानाचें घबाड एकदम लाभलें तर तें उपेक्षणीय व असंग्रहणीयहि वाटूं लागतें. आज पुणें शहरांतील म्युनिसिपालिटीच्या कारभाराचीं दप्तरें हा नगरसमाजाचा प्रत्यक्ष इतिहासच आहे. पण ही सगळी रद्दी शंभर वर्षांनीं कोणाला एकवटलेली मिळेल तर, आजच्या गांवच्या कचऱ्याप्रमाणें भावी इतिहाससंशोधक त्या कागदपत्रांची वासलात लावील. ज्या आईबापांना पुष्कळ मुलें होऊन तीं निवर्तलेलीं असतात तीं सर्वच्या सर्व आणून त्यांच्यापुढें केव्हां उभीं केलीं तर त्यांचीहि भावना काय असेल याची कल्पना सहज करतां येईल.

श्रीकृष्णानें गुरुपत्नीला तिच्या अनेक मृत पुत्रांचें दर्शन घडविलें असें वर्णन आहे. पण एक अलिखित वर्णन असेंहि आहे कीं, त्या पुत्रांचें दर्शन घेऊनच गुरुपत्नीचें समाधान झालें. श्रीकृष्णाला दैवी शक्ति असून, तीं जिवंत केलेलीं सर्व मुलें तशींच गुरुगृहीं नांदण्याला त्याला जिवंत ठेवतां आलीं असतीं. पण गुरुपत्नीनें हा दुसरा वर मागितल्याचें पुराणांत नाहीं! सरकारी कचेरींतल्या रेकॉर्डप्रमाणें ज्ञानाचाहि नित्य नैमित्तिक प्रळय होत असतो म्हणूनच वरें असेंहि कोणीं म्हणेल. शिवाय मनुष्यप्रयत्नानें राखून ठेवलेल्या कागदपत्रांच्या संहाराची काळजी जसा कसरीचा किडा करीत असतो, त्याप्रमाणें ज्ञानसंहाराला मनुष्यसहज विस्मृति मदत करीत असतेच. तात्पर्य, इतिहाससंशोधनानें उत्पात धरणीकंप होऊन त्यानें उकरून काढिलेल्या

ढिगापर्वताखालीं आम्ही गुदमरून जाऊं अशी भीति वाटण्याचें कोणास कारण नाहीं.

इतिहासज्ञानाच्या दुर्मिळतेविषयीं हें झालें. पण तें ज्ञान दुर्मिळ असून, उपलब्ध होतें तेंहि संशयास्पद असतें. त्या योगानेंहि त्याच्या महत्त्वांत भर पडते. या संशयास्पदतेच्या आक्षेपाची कड पोंचवून एकानें असेंहि म्हटलें आहे कीं, History is a fable which is agreed to by all men. पण या आक्षेपांतील दुसरा भाग खरा नाहीं. सर्व जगांतील मनुष्यांचें एकमत झालें अशी गोष्टच नाहीं. म्हणून "इतिहास ही सर्व जगानें कट करून रचून सांगितलेली कपोलकल्पित कथा" असें म्हणणें चूक आहे. एकानें एक म्हटलें कीं लगेच दुसरा दुसरें म्हणतो. या विरोधाच्या चाळणींतून निर्भेळ पीठ खालीं कितीसें पडणार ?

## ज्ञानार्जनाचीं साधनें

पण दुसऱ्याच्या संशयाबरोबर स्वतः इतिहाससंशोधकाचें मन संशयग्रस्तच असतें. निदान तें तसें असावें असें मी तरी म्हणेन. रास्त संशय म्हणजे सत्यज्ञानान्वेषणाची चिकित्सा ही संशोधकाला भूषणास्पद ठरते. कारण, आपण प्रत्यक्ष म्हणजे डोळ्यानें पाहिलें म्हणतों तें तरी निर्बाध असतें काय ? आधुनिक तत्त्वज्ञानी लोकांप्रमाणें भारतीय तत्त्वज्ञानी लोकांनींहि तत्त्व-ज्ञानप्रामाण्याची चिकित्सा कसोशीनें केलेली आहे. या प्रामाण्यमार्गांतील त्यांनीं दाखविलेल्या अडचणी किंवा उपाधी लक्षांत आणल्या म्हणजे सत्य-ज्ञानाविषयीं मनुष्य साशंक न होईल तर काय करील ? एकानें विनोदानें असें म्हटलें आहे, दोन डोळे व दोन कान मिळून ज्ञानार्जनाचीं चार साधनें, आणि तें ज्ञान प्रगट करण्याचें जिव्हा हें एकच साधन ! म्हणून ऐकल्या-पाहिलेल्या चौपट ज्ञानांतील फार तर एक हिस्सा ज्ञान माणसानें खरें म्हणून जिभेनें बोलून दाखवावें. कान व डोळे यांप्रमाणेंच ज्ञान मिळवून देणारीं, पण त्याबरोबरच ज्ञानाला उपाधी निर्माण करणारीं, त्वचादिकादि अनेक आहेत. त्यामुळें ज्ञान अधिकच संशयास्पद ठरतें.

## ऐतिहासिक ज्ञानाचा सूक्ष्म शत्रु

पण ज्ञानाचीं हीं गंडांतरें एवढ्यानें संपत नाहींत. वरील सर्व साधनांनीं

मिळवून दिलेलें ज्ञान सत्य असलें तरी मनुष्याचा स्वार्थ व स्वाभिमान हे त्याला विकृत करण्याला तयार बसलेलेच असतात. यामुळें संशोधित शुद्ध ज्ञानहि सत्य स्वरूपानें जगाच्या अंगीं लागत नाहीं. स्वार्थ व अभिमान यांनीं इतिहासांत केवढे वाद माजविलेले आहेत हें लोक जाणतातच. पण या दोहोंहून हीनपणांत कमी पण सूक्ष्मपणांत अधिक यशस्वी अशीहि एक उपाधि आहे. ती म्हणजे मनुष्याची कलाप्रियता ! सत्य ज्ञान मांडतांना तें नुसतें मांडून माणसाला आनंद होत नाहीं. तर तें सजवून मिरवावें असें त्याला वाटतें, मग त्यांत त्याचा स्वार्थ किंवा अभिमान साधावयाचा नसेना का ? या दृष्टीनें अलंकारिक भाषा हा ऐतिहासिक ज्ञानाचा शत्रू ठरतो. एकूण काय कीं, एका लेखकानें म्हटल्याप्रमाणें Veracity of historical statement is the most fleeting of Human varieties. म्हणजे सत्य ऐतिहासिक विधान ही फक्त आशा करण्याचीच गोष्ट होय, अर्थात् कधीं सफळ न होणारी आशा करण्याचीच.

यांत मनुष्य–दोषाप्रमाणेंच परिस्थितीचा दोषहि कांहीं असतो हें खरें. कारण ऐतिहासिक पुरावा ही एकदांच घडणारी गोष्ट असते; व तिचा तत्कालीन साक्षीदार हाच जर मुख्य पुरावा मानला तर दुर्दैवानें तो एकदांच बोलून जातो. तो तपासणीला किंवा फेरतपासणीला पुनः उपलब्ध होत नाहीं. शिवाय कोर्टापुढें आलेल्या साक्षीदाराची चालचलणूक व स्वभाव न्यायाधिशाला प्रत्यक्ष पाहतां येतात. यामुळें त्यास साक्षीदारानें दिलेल्या पुराव्याला स्वतंत्र कसोटी लावतां येते. उलट भौतिक शास्त्रांत पदार्थांच्या गुणधर्मांचें व त्या गुणधर्मानुरूप घडणाऱ्या त्यांच्या कार्याचें ज्ञान हे प्रयोगाच्या द्वारें भौतिक शास्त्रज्ञांना अनेक वेळां हुकमी आपल्यापुढें हजर करून घेतां येतें, आणि त्या साक्षीदारांची तपासणी स्वतःला व लोकांना करून देतां येते. तात्पर्य, इतक्या उपाधींच्या चक्रव्यूहांतून किंवा भुलभुलाईतून बाहेर पडणारें जें ऐतिहासिक ज्ञान त्याचें महत्त्व मनुष्याला कां वाटूं नये ? अशा ज्ञानाचा एकेक कण हा मनुष्याला आपला मौल्यवान निधि वाटावा यांत आश्चर्य नाहीं.

शेवटीं इतिहास-लेखकाचें ऐतिहासिक ज्ञानच काय पण प्रत्यक्ष ज्ञानहि किती बाधित असतें याचें एक उदाहरण म्हणून पुढील गोष्ट सांगतां

येईल. हर्बट फिशर यानें आपल्या ग्रंथांत जेम्स अँथनी फरड नांवाच्या सुप्रसिद्ध इतिहासकाराची फजिती केलेली आहे. ती अशी कीं, प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहून एकदोन शहरांचें त्यानें जें वर्णन म्हणून पुढें स्मरणानें केलें तें बहुतांशीं चूक होतें असें फिशरनें दाखविलें आहे. पण तें सर्व येथें देण्याचें कारण नाहीं. तथापि हें सर्व खरें असतांहि इतिहाससंशोधन हा एक उत्तम ज्ञानार्जनाचा मार्ग व फार उच्च संस्कृतीची करमणूक असून, ऐतिहासिक सत्य सिद्धांत निर्बाध स्थापणें हा एक मनुष्यपराक्रमच होय."

* * *

[ केसरी, ता. १ जुलै १९३५ ]

"मंडळाच्या कार्याचा व्याप वाढत आहे व अधिक जागेची जरूरी भासत आहे. यासाठीं अधिक जागा सरकारमार्फत संपादन करून घेण्याची तजवीज सुरू आहे. मंडळाचें एक पाखें मोकळें होतें तें बांधण्याचा कार्यक्रम ठरविला होता तोहि पार पडला आहे. त्याचप्रमाणें कारभारी मंडळानें आजीव सेवकांची योजनाहि हातीं घेतली आहे. मंडळाचा सर्व वस्तूंचा संग्रह नवीन पाख्यांत आतां व्यवस्थेनें लावला आहे. याच वेळीं लगतच्या गोष्टींपैकीं धुळें येथें श्री. शं. द. देव यांनीं आपल्या एकटयाच्या प्रयत्नानें 'श्रीसमर्थ वाग्देवता मंदिर' सिद्धीस नेलें, आणि इतिहासकार्यास त्या बाजूस जें एक चिरस्थायी स्वरूप दिलें त्याबद्दल कौतुक व समाधान व्यक्त केलें पाहिजे. अशीच दुसरी एक आनंदाची गोष्ट म्हणजे आपल्या मंडळांतील संशोधक रा. वासुदेवराव बेंद्रे यांस संशोधनासाठीं विलायतेस जाण्यास सरकारनें अडीच वर्षांची भर पगारी रजा व दोनशें पौंडांची रोख मदत देण्याचें ठरविलें आहे ही होय. यामुळें रा. बेंद्रे यांच्या योग्यतेबद्दलहि सरकारची किती अनुकूल समजूत आहे हें सिद्ध होतें.

## दुर्भिळ म्हणून महत्त्वाचें

हिंदुस्थानची आर्थिक उन्नति झाली म्हणजे सर्व कांहीं झालें, इतिहास-संशोधन करणें हें फुकट श्रम करणें असा काहीं लोकांचा प्रामाणिक आक्षेप आहे. परंतु जसें आम्ही शिवाजी महाराजांचें हस्ताक्षर ठरविण्याविषयीं खटपट करीत आहों तशी जीझस ख्राइस्टच्या हस्ताक्षराबद्दलहि तिकडे धड-

पड चालू आहे, ती कां ? वास्तविक पाहतां जिज्ञासा ही माणसाला केव्हांहि अनावर असते, त्याचप्रमाणें जिज्ञासातृप्तीचाहि आनंद अपूर्व असतो. इतिहास शोधणें म्हणजे एक प्रकारें आपल्या पूर्व जन्माचें संशोधन करण्यासारखें आहे. चांगले चांगले लोक भृगु संहितेंतील आपल्या पूर्वजन्माची हकीकत समजण्याकरितां अडीचअडीचशें रुपये खर्च करितात हें मला माहीत आहे. खरें पाहिलें तर प्राचीन काळचें ज्ञान फार दुर्मिळ असतें यामुळेंच त्याचें महत्त्व आहे. भिकाऱ्याला एकादा सोन्याचा कण शोधण्याकरितां पावसानें वाहिलेलीं गटारें शोधण्याचे श्रम करण्यांतच आनंद वाटत असावा; नुसत्या सोन्याच्या लगडी हाताळणाऱ्या पेढींतील कारकुनास तो आनंद लाभत नाहीं. एकीकडे दुर्मिळ साधनें जमविण्याचें व संरक्षण्याचें काम चालू आहे तर दुसरीकडून निरुपयोगी वाटणाऱ्या कागदांच्या संहाराचें कामहि मनुष्याकडून तितक्याच जोरानें चालू आहे. इतिहासाला माझ्या मतें तीन शत्रू आहेत. एक स्वार्थ, दुसरा स्वाभिमान, व तिसरी कलेची उपाधि. या तीनहि गोष्टींमुळें इतिहास विकृत होत असतो. या गोष्टी लक्षांत ठेवून आपलें काम आपण चालविलें पाहिजे.”

---

लेख एकोणिसावा

## धुळेकर व पुणेकर

[ केसरी, ता. २९ जानेवारी १९३५ ]

कै. राजवाडे यांनीं लिहून ठेवलेल्या मराठी धातुकोशासंबंधानें जो वाद उत्पन्न झाला आहे त्यांत केळकर, करंदीकर, केसरी, मोडकशास्त्री व सर्वसामान्य पुणेकर मंडळी इत्यादिकांवर धुळें येथील दोन प्रमुख गृहस्थ रा. शंकरराव देव व रा. भट वकील यांनीं अनेक प्रकारचे नसते आक्षेप घेतले. पैकीं रा. करंदीकर व केसरी यांच्यातर्फे जें उत्तर द्यावयाचें तें केसरीच्या

गेल्या अंकांत रा. करंदीकर यांच्या सहीनें प्रसिद्ध झालेंच आहे. त्याच अंकांत रा. मोडकशास्त्री यांचाहि खुलासा प्रसिद्ध करण्यांत आला आहे. राहतां राहिले केळकर व पुणेंकर मंडळी. पैकीं स्वतःसंबंधानें लिहिण्याचा अधिकार मला आहेच. पण मी स्वतः एक पुणेंकर या सदराखालीं पडणारा म्हणून पुणेंकर या वर्गासंबंधानेंहि लिहिण्याचा यथांश तरी अधिकार मला येतोच. म्हणून या दोहोंतर्फे दोन शब्द लिहितों.

'सकाळ' पत्राच्या धुळें येथील बातमीदारानें तेथील सभेचा वृत्तांत दिला त्यांत 'केळकरांनीं (देव व भट यांच्याशीं झालेला) करार मोडला' असें वाक्य आलेलें वाचून मला विस्मयच वाटला. कारण राजवाडेकृत धातु-कोश प्रकरणीं मीं कोणाशीं कांहींच करार केलेला नव्हता. म्हणून 'सकाळ' पत्रांतील वाक्य उद्धृत करून मी रा. शंकरराव देव, धुळें यांस पत्र लिहिलें त्यांच्या उत्तरांत त्यांनीं मला कळविलें कीं, 'तुम्ही कोणताहि करार केला नाहीं किंवा मोडलाहि नाहीं. उलट धातुकोशाच्या प्रसिद्धीसंबंधानें ज्यांवर आक्षेप घेतले त्यांतून तुमचें नांव मुद्दाम वगळण्यांत आलें होतें. कारण तुमचेवर तसा आक्षेप कांहीं करतां येण्यासारखा नव्हता.' या गोष्टीस आज सुमारें दहा बारा दिवस झाले. रा. देव हे 'सकाळ' पत्राकडे स्वतःच्या सहीनें, किंवा धुळें येथील 'सकाळ'च्या बातमीदाराकडून, खुलासा प्रसिद्ध करवितील अशी आशा वाटत होती. पण तें अद्यापि घडलें नाहीं. मग प्रश्न असा कीं, हा खुलासा त्यांनीं अशा रीतीनें कां करूं नये? अन्याय झाला मला व त्याचें परिमार्जनहि मींच करावें हा न्याय कोठला? रा. देव यांना इच्छा असती तर त्यांना चार ओळी लिहून 'सकाळ' पत्राकडे सहज पाठवितां आल्या असत्या.

धातुकोशासंबंधानें अनेक विद्वानांच्या सह्यांचें पत्रक रा. मोडकशास्त्री यांनीं केसरीकडे आणून दिलें. त्या वेळीं रा. करंदीकर हे पुण्यास नसल्यानें तें मी छापलें. त्याची सर्व जबाबदारी मजकडे आहे. परंतु या पत्रकांत न छापण्यासारखें कांहीं नव्हतें अशी माझी तेव्हां समजूत होती व आजहि आहे. कारण त्या पत्रांतील अभिप्रायांत राजवाडेकृत व्युत्पत्त्यांचा, फक्त एका विशेष दृष्टीनें अशास्त्रीयपणा दाखविला होता. हा धातुकोश छापून प्रसिद्ध करण्याबाबत महाराष्ट्रीय जनतेला उद्देशून लिहिलेलें विनंतिपत्र

प्रसिद्ध करण्याचा हक्क जसा एकाला, तसाच त्याविरुद्ध घेतला जाणारा अशास्त्रीयतेचा आक्षेप प्रसिद्ध करण्याला दुसऱ्या कोणास हरकत कां असावी ? कै. राजवाडे हे एका परीनें विद्वान् होते; पण रा. मोडकशास्त्री हेहि एका परीनें विद्वानच आहेत. आणि त्यांच्या आक्षेपाला पुष्टि देणारे पांचपंचवीस महाराष्ट्रीय गृहस्थ व शास्त्री हेहि आपापल्या परीनें विद्वानच आहेत. राजवाडेकृत मराठी धातुकोश ही सार्वजनिक महत्त्वाची बाब. अर्थात् याविषयीं फक्त साधक तेवढें प्रसिद्ध व्हावें व बाधक प्रसिद्ध होऊंच नये असा आग्रह कोणीं कां धरावा ?

केसरींत प्रसिद्ध केलेल्या अभिप्रायपत्रकांत धातुकोशाच्या छपाईकरितां कोणीं वर्गण्या देऊं नयेत किंवा तो छापूं नये असें म्हटलेलें नाहीं. हा कोश छापण्याकरितां वर्गण्या मिळविण्याचा उद्देश धुळेकरांचा असला तरी अभिप्रायपत्रकांत फक्त अशास्त्रीयतेपुरताच मुद्दा मांडलेला आहे. त्याच्या योगानें वर्गण्या जमण्यास अप्रत्यक्ष रीत्या कांहीं अडचण येणारी आहे असें गृहीत घेतलें तरी अडचण उत्पन्न करूंच नये, प्रसिद्धि व्हावयाची ती फक्त एकांगी व्हावी, असा जुलूम राजवाडे संशोधक मंडळानें लोकांवर कां करावा ? अभिप्राय प्रतिकूल प्रसिद्ध झाले याचीहि जबाबदारी केसरीवर किंवा रा. मोडकशास्त्री यांजवर नसून, ती धातुकोशकार्याचा डौलदार रीतीनें गाजावाजा करतांना दुर्दैवानें त्यांत नक्की अशास्त्रीय ठरेल अशी व्युत्पत्ति जगापुढें मांडणाऱ्या अकुशल किंवा अज्ञानी गृहस्थाकडे येते. आणि तें पहिलें प्रसिद्धीकरण अनधिकारी रीतीनें झालें असें म्हणण्यानें आतां अडचणींतून सुटका होणें कठिण आहे. पण वाटल्यास तसें म्हणून समाधान करून घ्यावें.

वर्गणीची बाब सोडून दिली तरी आणखी वेगळा असा एक सूक्ष्म आक्षेप घेण्यांत आला आहे. तो असा कीं, " कोणी एकादें पुस्तक छापण्यास तयार झाल्यास त्याला तें छापूं नको असें शहाण्यानें म्हणूं नये. छापणारा छापीना का ? " यासंबंधानें, छापूं नये अशी सूचना केसरींत प्रसिद्ध झाली नाहीं हें वर आलेंच आहे. उरलें रा. मोडकशास्त्र्यांपुरतें. कारण इतर वर्तमानपत्रांतून त्यांनीं तशी जाहीर सूचना केली होती हें खरें आहे. याविषयीं स्वतः त्यांचें उत्तर ते देतील. पण कर्मधर्मसंयोगानें घडलेल्या एका गमतीच्या

गोष्टीचा उल्लेख मात्र मला करावासा वाटतो. 'त्रिकाळ' पत्राच्या अंकांत खालील मजकूर आला आहे :—

"गेल्या राजवाडे स्मृतिदिनाच्या निमित्तानें केलेल्या भाषणांत त्यांनीं धुळें विरुद्ध पुणें, हा नसता वाद उत्पन्न केल्यामुळें व राजवाडे शब्दकोशाच्या प्रसिद्धीला विरोध करणारे पुणेंकर हे कोणी तरी देशद्रोही आहेत असा आभास त्यांनीं उत्पन्न केल्यामुळें, पुढील एकच गोष्ट त्यांना विचारण्याचें मीं आज ठरविलें आहे.

"कोणत्याहि सदुद्योगाला मोडता घालूं नये. अशा उद्योगाला प्रत्येकानें शक्य तीं मदतच करावी, असें ऐसपैस तत्त्व प्रतिपादून, श्री. शंकरराव देव हे श्री. मोडकशास्त्री यांच्या विरोधाची टर उडवूं पाहात आहेत. श्री. देव हे या प्रसंगीं ज्या व्यापक दृष्टीचा उपदेश लोकांना करीत आहेत तीच व्यापक दृष्टि ते इतरांच्या उद्योगाला लावीत नाहींत असें जाहीर रीतीनें म्हणण्याला जरूर असणारा पुरावा मजपाशीं आहे. महाभारत व रामायण यांतील सुभाषितांचा संग्रह प्रसिद्ध करणारे श्री. परांजपेशास्त्री यांनीं नुकताच 'परांजपे घराण्याचा इतिहास' प्रसिद्ध केला आहे. या इतिहासांतील साधनसामग्री जुळवीत असतां, परांजपेशास्त्री हे श्री. शंकरराव देव यांना भेटले होते; व या इतिहासाला उपकारक अशी माहिती ते श्री. देव यांजपाशीं मागत होते. त्या प्रसंगीं श्री. देव यांनीं माहिती तर दिली नाहींच, उलट परांजपेशास्त्री यांच्या उपयुक्त उद्योगाची त्यांनीं हवी तशी निर्भर्त्सनाहि केली. वास्तविक पाहतां परांजपे घराण्याचा इतिहास हा सार्वजनिक द्रव्यसाहाय्यावर प्रसिद्ध व्हावयाचा नव्हता. त्यामुळें श्री. देव यांनीं त्या इतिहासप्रसिद्धीला विरोध करण्याचें कांहींच कारण नव्हतें. असें असतां श्री. देव यांनीं परांजपेशास्त्री यांना जो विरोध केला तो समर्थनीय कसा ठरतो याचें उत्तर श्री. देव यांनीं अगोदर द्यावें, आणि मग मोडक शास्त्रीप्रभृति पुणेंकरांवर त्यांनीं हवी तर आग पाखडावी."

परांजपे घराण्याचा ग्रंथ परस्पर छापला जात असतां तो छापला जाऊं नये हा शंकरराव देव यांचा उपदेश सयुक्तिक तर राजवाड्यांचा अशास्त्रीय धातुकोश छापला जाऊं नये हें मोडकशास्त्र्यांचें म्हणणें अयुक्तिक का?

मोडकशास्त्र्यांना कोणीं दुर्वास असें नांव दिलें आहे ! मोडकशास्त्री हे एकपट दुर्वास असतील, तर श्री. देव हे दसपट दुर्वास ठरत नाहींत काय ?

धुळ्याच्या सभेंत दुसराहि एक आक्षेप घेण्यांत आला होता, व तो तर फारच अश्लाघ्य होता, तो असा कीं, "राजवाडे यांचा धातुकोश कोणा पुणेकरांना छापून आपला तळीराम गार करावयाचा होता. किंवा कीर्तिध्वज मिरवावयाचा होता; पण धुळेकरांनीं त्यांचा हा लाभ हिरावून घेतला, या मनांतल्या रागानें मोडकशास्त्र्यांना हाताशीं धरून त्यांनीं धातुकोशाविरुद्ध चळवळ चालविली आहे ! "

हा आक्षेप अश्लाघ्य अशाकरितां कीं, त्यांत पुणेकरांच्या स्वार्थबुद्धीची सूचना आहे. आतां या कामीं माझ्या माहितीप्रमाणें द्रव्याचा तर नाहींच नाहीं, पण कीर्तीचाहि लोभ पुण्यांत कोणी धरिला नव्हता. माझी माहिती खरी असेल तर पुण्यांतील कोणी धंदेवाईक प्रकाशकानें किंवा छापखानेवाल्यानें 'धातुकोशाच्या' प्रकाशनाचा हक्क किंवा छपाईचें काम देव अगर भट यांजकडे मागितलें नव्हतें. उलट रा. कृ. पां. कुलकर्णी यांच्याच सूचनेवरून हा प्रश्न पुढें आला असतां 'मराठी शब्दकोश' मंडळानें राजवाडे संशोधन मंडळाकडे असें कळविलें होतें कीं, " धातुकोशांतील धातू योग्य ठिकाणीं शब्दकोशांत घालून त्याला आधार म्हणून राजवाडे यांच्या नांवाचा उल्लेख करूं आणि शेवटीं पुरवणीरूपानें सबंध धातुकोश शब्दकोशाबरोबर छापून त्याच्या ५०० प्रती धुळ्याच्या मंडळाला देऊं." या योजनेबद्दल मंडळाचा विचार घेऊन कळवूं असें शब्दकोश मंडळाचे चालक रा. दाते यांना धुळ्याहून प्रथम लिहून आलें. पण पुढें त्या सूचनेचा कांहींच विचार झाला नाहीं. तात्पर्य, पुण्यांत कोणाचा स्वार्थ बुडाला म्हणून मोडकशास्त्र्यांच्या आडून ही कारवाई सुरू आहे असा जो ध्वनि काढण्यांत आला आहे, किंबहुना प्रत्यक्ष आक्षेप घेण्यांत आला आहे, तो सर्वस्वीं निराधार आहे. शब्दकोशकारांचा उपकार धुळ्याच्या राजवाडे मंडळाला नको होता तर तो त्यांनीं घेऊं नये; पण स्वार्थाचा खोटा आरोप तरी त्यांजवर करूं नये.

शेवटीं मला इतकेंच सांगावयाचें कीं, देव व भट यांसारख्या संस्कृतिसंपन्न लोकांनीं 'पुणेंकर' या नांवानें एकंदर पुण्यांतील कार्यकर्त्यांची सामुदायिक निंदा करावी हें त्यांना शोभत नाहीं. रा. भट यांनीं केसरीकडे पाठविलेल्या

पत्रांत पुणेंकर 'सोदे' असा ऐतिहासिक उल्लेख केला होता. तो केसरी-कारांनीं त्या पत्रांतून गाळला! तथापि इतर कोठें तो प्रसिद्ध झाला आहे असें म्हणतात, तो वाचकांनीं पाहावा व त्यावरून त्या लेखकाची मनोवृत्ति जाणावी. या अप्रिय विषयासंबंधानें याहून अधिक लिहिण्यास मी धजावत नाहीं. पण 'पुणेंकर' म्हटले जाणाऱ्या लोकांना बाहेरील कोणच्याहि 'करा' प्रमाणेंच स्वाभिमान संभाळण्याचा हक्क आहे, इतकेंच मी रा. देव व रा. भट यांना सुचवितों.

---

लेख विसावा

# कर्नाटक व महाराष्ट्र

[बुधवार ता. १६ ऑगस्ट रोजीं पुणें येथील 'म्हैसूर असोसिएशन' नामक संस्थेच्या सभासदांपुढें दिलेल्या व्याख्यानाचा सारांश.]

"तुम्ही म्हैसूर असोसिएशनचे सभासद म्हैसूर सोडून पुण्यास विद्याभ्यासाकरितां येऊन राहतां हा एका दृष्टीनें तुम्ही पुण्याचा बहुमानच करतां. पण हीच परंपरा आज सुमारें अर्धशतक सुरू आहे. ती अशी कीं, पुणें येथें एंजीनियरिंग कॉलेज असून एल. सी. ई. परीक्षेंत पहिल्या येणाऱ्या विद्यार्थ्याला असिस्टंट एंजीनियरची जागा मुंबई सरकार एकदम देत असे. या जागा म्हैसूर व कर्नाटककडील विद्यार्थ्यांनींच पटकावाव्या असा क्रम अनेक वर्षें सुरू होता. बेंगलोर कृष्णराव, करपूर श्रीनिवासराव, सर विश्वेश्वर अय्या अशीं किती तरी नांवें याविषयीं सांगतां येतील. विश्वेश्वर अय्या हे मराठी भाषा पुण्यासच शिकले व ते स्वतःस पुण्याचे नागरिक समजतात. पण परक्या प्रांतांतील लोकांनीं आपल्या प्रांतीं येऊन राहणें हा जर बहुमान असेल तर त्याच्या उलट आहेर आम्हां महाराष्ट्रीयांनीं तीन सवा तीनशें वर्षांपूर्वी म्हैसूर-बंगलूरास केला आहे. आणि त्या महाराष्ट्रीय वस्तीचे अवशेष

आजहि मद्रासेपर्यंत आढळतात. कारण जो जो म्हणून राव नांव लावतो तो प्रत्येक जरी महाराष्ट्रीय नसला तरी पुष्कळसे महाराष्ट्रीय राव या नांवा-वरून ओळखतां येतात. एकाचें पाहून दुसरा नांव घेतो. आंध्र देशांतहि राव म्हणविणारे अनेक लोक आढळतात. तथापि मद्रास-बंग-लोरकडचे राव वेगळे व हे वेगळे. गतवर्षी मी मद्रासेस गेलों तेव्हां तेथील जुन्या महाराष्ट्रीय वसाहतवाल्यांनीं शिक्षण व समाजसेवा याविषयीं मोठे प्रयत्न चालविलेले आढळले.

## म्हैसुरी व मद्रासी

म्हैसुरी, म्हणजे कर्नाटकी व मद्रासी म्हणजे तामील वगैरे लोक इकडच्या लोकांना एकासारखे एक वाटतात. पण म्हैसुरी मनुष्य मद्रासी म्हणवून घेण्यास तयार नसतो. पसतीस वर्षांपूर्वी माझे मित्र कै. ॲडव्होकेट सेटलूर यांची ओळख एका स्नेह्याला करून देतांना मी त्यांना मद्रासी गृहस्थ असें म्हटलें. त्यावर ते थट्टेनें पुष्कळ रागावले, पण खरा रागहि त्यांत थोडा होता. मी म्हणालों, 'तुम्ही सर्व सारखे दिसतां.' ते म्हणाले 'आमच्या रुमालाच्या बांधणींत तुम्हांला कांहींच फरक दिसत नाहीं काय?' मी म्हणालों, 'फरक असलाच तर भूमितींतील वक्ररेषा, वर्तुळाकार रेषा यांच्यांतील फरकाइतकाच तो सूक्ष्म असेल.' अर्थात् थोडचाशा विचारानें मला तामील व कर्नाटकी यांतील भेद उमगला. परंतु हिंदुस्थानांतील उप-राष्ट्रांच्या लोकांतील भेद आम्हां हिंदवासी लोकांना काय सहज कळतो अशी जी घमेंड होती ती या प्रसंगीं जिरली खरी ! !

## मद्रासी विद्यापीठांत मराठी

अनेकत्वांत एकत्व पाहणें हें तत्त्वज्ञाच्या ऐटीचें दिसतें. पण आधीं अनेकत्वांत वेगवेगळे कोण कसे आहेत याचें ज्ञान चांगलें झाल्यावर मग एक-त्वाच्या भावनेची ऐट शोभून जाते; नाहीं तर रोकडें अज्ञान पदरीं येतें. ही गोष्ट घडली त्याच सालीं मद्रासेस राष्ट्रीय सभेला मी गेलों; तेव्हां तेथील महाराष्ट्र समाजाची म्हणजे जुन्या राव लोकांची चांगली ओळख झाली. सर टी. माधवराव यांच्या चिरंजीवांनीं तिकडचा सर्व इतिहास सांगितला;

विशेषतः आम्ही लोक मराठीचा अभिमान किती बाळगतों हें त्यांनीं सांगितलें. तें ऐकून आनंद झाला. पुरुषाची मराठी भाषा फार बिघडली आहे पण स्त्रिया अधिक शुद्ध बोलतात व जुन्या पोथीपुस्तकांतील वाङमय व बायकांचीं गाणीं फार शुद्ध म्हणतात असें पाहिलें. मद्रास युनिव्हर्सिटींत मराठी हा परीक्षेचा विषय जेव्हां होता, तेव्हां इकडे मुंबई युनिव्हर्सिटींत मराठीचा प्रवेश करण्याच्या रा. मोडक व रानडे यांनीं आरंभिलेल्या वादाला सुरुवातहि झाली नव्हती. मद्रास युनिव्हर्सिटीच्या कॅलेंडरांत छापलेले सर टी. माधवराव यांनीं काढलेले मराठीचे कांहीं पेपर मीं वाचले तेव्हां बरेंच हंसू आलें. परंतु मातृभाषेच्या अभिमानानें त्यांनीं केलेला हा प्रयत्न पाहून कौतुक वाटलें. असो.

## म्हैसूर प्रांतांत मराठ्यांचा प्रवेश

म्हैसूर प्रांताकडे मराठ्यांचा प्रवेश म्हणजे तुम्हा सभासदांच्या पूर्वजांचा प्रवेश कसा झाला हें तुम्हांला बहुधा माहीत असेलच. सतराव्या शतकाच्या प्रारंभीं म्हैसूर कर्नाटकांत जी हिंदु राजकीय सत्ता होती ती पाळेगार, देसाई, नायक वगैरे स्थानिक शिरजोर पुढाऱ्यांच्या हातीं होती. हे लोक जुन्या हिंदु राजांचे अधिकारी असून या सुमारास स्वतंत्र झाले होते. पण अशा छोटेखानी राजाचें स्वातंत्र्य किती दिवस टिकणार? वरून एका बाजूनें गोवळकोंड्याचा व दुसऱ्या बाजूनें विजापूरचा असे दोन मुसलमान बादशहा दक्षिणेकडे आपली सत्ता प्रस्थापित करीत चालले होते. पैकीं गोवळकोंड्याचें साधलें नाहीं. विजापूरचें मात्र बरेंच साधलें. या सुमारास शिवाजी-महाराजांचे वडील शहाजी राजे हे विजापूर दरबारच्या पदरीं लष्करी अधिकारी असून सेनापति रणदुल्लाखान याच्या हाताखालीं दुय्यम म्हणून त्यांची कर्नाटकांत नेमणूक झाली होती. पुढें रणदुल्लाखानाला मागें सारून शहाजी राजे यांनीं आपले पाय कर्नाटकांत रोवले व आपल्या सैन्याच्या खर्चा-करितां पांच परगण्यांची जहागीर बादशहाकडून मिळविली. ते परगणे शिरें, होस्कोट, कोलार (हल्लींच्या सोन्याच्या खाणीचा मुलूख), बाळापूर हे चार व बंगलोर हा पांचवा. हे सर्व परगणे घाटमाथ्यावर होते. पण शहाजी राजे यांनीं पाइन घाट उतरून खालीं अरणी, वेलोर व जिंजी हीं

ठाणीं हस्तगत केलीं. अशा रीतीनें मराठे मद्रासच्या बाजूला पूर्व व ईशान्य या दिशेनें पुढें सरकले.

## शहाजीची कारकीर्द

शहाजीनें कर्नाटकांत (म्हणजे मुसलमानांच्या भाषेनें कृष्णा नदी व रामेश्वर या दरम्यानच्या सर्व मुलुखांत) पाळेगार, देसाई व नायक यांजवर आपला अंमल हळूहळू बसविला. ते कांहीं खंडण्या देत व त्यांचा पत्रव्यवहार शहाजीशीं चाले. अर्थात् जबरदस्ताच्या भाषेला कोठेंहि मान मिळतोच. तसें त्या वेळीं मराठी भाषेचें कांहीं काळ झालें. आपल्या जहागिरीची व्यवस्था ठेवण्याकरितां शहाजीला मराठी कारकून-फड हवाच होता. तसेंच वरील पाळेगार वगैरे लोकांच्याहि कचेरींतून मराठी कारकुनांचा प्रवेश झाला आणि कांहीं काळपर्यंत हे लोक सही करणें व मायने लिहिणें इतक्या-पुरतें तरी मराठी शिकलेले असून शहाजीला पाठवावयाच्या पत्रांत वरील गोष्टी आपल्या हातानें मराठींत लिहीत. कांहींचे हिशेबहि मोडींत लिहिले जात असें म्हणतात. अशा रीतीनें शहाजीच्या अंमलामुळें महाराष्ट्रीय कुटुंबांची दक्षिण कर्नाटकांत वसाहत झाली. शहाजी स्वतः बंगलोरास राही. तरी तंजावर येथेंहि त्यानें आपल्या जहागिरीवर शिवाजीचा सावत्र भाऊ व्यंकोजी याची स्थापना केली होती.

## स्वातंत्र्याचें अग्निहोत्र

शहाजीच्या मरणानंतर कांहीं वर्षांनीं शिवाजीनें स्वतःस राज्याभिषेक करविल्यावर १६७७ सालीं कर्नाटकांत स्वारी करून एका तंजावराखेरीज शहाजीच्या अंमलाचीं सर्व लष्करी ठाणीं आपल्या ताब्यांत घेतलीं. तसेंच कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांमधीलहि कांहीं मुलूख जिंकला. अशा रीतीनें महाराष्ट्रांत शिवाजी महाराजांचें जितकें स्वराज्य तितकेंच जवळ जवळ कर्नाटकांतहि होऊन राहिलें. त्याचा फायदा प्रत्यक्ष शिवाजी महाराजांना फार काळ घेतां आला नाहीं. कारण ते १६८० सालीं वारले. पण १६८९ मध्यें मोगल सैन्यानें सर्व महाराष्ट्र पादाक्रांत केल्यावर राजाराम महाराजांना बृहत् कर्नाटकांतील जिंजी हें ठाणें आपलें रक्षण करण्याला व महाराष्ट्रीय स्वातंत्र्याचें अग्निहोत्र चालू ठेवावयाला उपयोगी पडलें.

## नबाबच नबाब !

राजाराम महाराज महाराष्ट्रांत परतून आल्यावर तिकडे मुसलमानांनीं हातपाय पसरून मराठ्यांच्या ताब्यांत असलेला दक्षिण कर्नाटकांतील सर्व मुलूख हस्तगत केला. फक्त व्यंकोजीच्या वंशजाच्या हातचें तंजावर आणि घोरपड्यांची गुत्ती एवढींच ठाणीं काय तीं मराठ्यांची खूण म्हणून राहिलीं. नंतर जिकडे तिकडे नबाबच नबाब झाले. ते इतके कीं एकदां हैदराबादच्या निजामाच्या दरबारीं १८ नवे लोक मुजऱ्याला आले. निजामानें हे कोण म्हणून विचारलें. तेव्हां 'नबाब' असें त्या १८ जणांचें वर्णन सांगण्यांत आलें ! हें ऐकून निजाम रागावला व म्हणाला कीं, 'माझ्या दरबारीं यापुढें कोणी नबाब म्हणवून घेणारा येईल तर त्याची पाठ मी चाबकांनीं फोडून काढवीन.'

हा नबाबी काळ सुरू असतां १७२६ पासून फिरून मराठ्यांच्या स्वाऱ्या कर्नाटकांत सुरू झाल्या, त्या १७९९ पर्यंत म्हणजे टिपू सुलतान मारला जाऊन म्हैसूरचें हिंदु राज्य इंग्रजांच्या कृपाछत्राखालीं येईपर्यंत. टिपूचा बाप हैदरअल्ली हा पुढें उदयास येण्यापूर्वीं म्हैसूरचा दिवाण नंदराज यानें म्हैसूरचे चौदा महाल मराठ्यांना आत्मरक्षणार्थ देऊं केले होते; पण पुढें ते हैदरानें काढून घेतले व टिपू तर घटप्रभा नदीपर्यंत वर चालून आला होता हें प्रसिद्ध आहे. मराठे कर्नाटकांतून परत फिरण्यापूर्वीं त्यांनीं सरहद्दीवर टिपूच्या तोंडाशीं पटवर्धन सरदार ठेवले. त्यांचीं ठाणीं अद्यापि तालुक्याच्या रूपानें तिकडे आहेत. मिरज, सांगली, जमखंडी यांचा एकेक तालुका कर्नाटकांत आहे. अशा रीतीनें मराठ्यांचा म्हैसूर कर्नाटकाशीं संबंध आला व राहिला.

## हैदराची आई मराठी

शेवटीं एकच गोष्ट सांगावयाची ती ही कीं खुद्द हैदराचाहि मराठ्यांशीं संबंध होता. तो असा कीं हैदर हा ज्या कोलार परगण्यांत जन्मला व त्याचा बाप ज्या शिरे परगण्यांत नोकरीला होता ते दोन्ही परगणे शिवाजी महाराजांच्या स्वराज्यांतले होते. आणि हैदराची आई, ही एक कोंकणी मराठी स्त्री होती ! असो; म्हैसूर कर्नाटकांतील महाराष्ट्रीयांचा हा

थोडासा इतिहास तुम्हांला सांगितला; कारण या सभेंतील बहुतेक लोक मूळचे महाराष्ट्रीय आहेत असें त्यांच्या चेहऱ्यांच्या ठेवणीवरून दिसतें.

म्हैसूर युनिव्हर्सिटींत अद्यापि एकादें लॉ कॉलेज नाहीं म्हणून कांहीं म्हैसुरी तरुण कायद्याच्या अभ्यासाला मद्रासला जातात व कांहीं इकडे येतात. जे इकडे येतात त्यांतले बरेचसे आपण जुने महाराष्ट्रीय अशा समजुतीनें येत असावेत. तसें असेल तर विशेष बरें वाटेल. तथापि उद्यां म्हैसुरास लॉ कॉलेज निघून तुमची पुण्यांतील वसाहत मोडली तरी फार वर्षांचा ऐतिहासिक संबंध तरी तुम्ही मनांत बाळगाल अशी मला आशा आहे."

---

## लेख एकविसावा

# अहंमदशहा अबदालीनें कोणती संधि साधली ?

[ प्रभात, मुंबई, डिसेंबर १९३३ ]

तारीख १४ ऑगस्ट ते ता. १४ जानेवारी सन १७६१ या साडेपांच महिन्यांच्या मुदतींत काय घडलें हें प्रथम भाऊसाहेबांच्या बखरींतून अगदीं सारांशरूपानें देतों. दिल्लीस मोर्चे लावून ती घेतली. शिंदे होळकर यांनीं सुरजमल आणून भेटविला. अलमशहा याला गाजीउद्दिनानें मारल्यापासून कोणी बादशहा नव्हता. म्हणून भाऊंनीं अल्लिगोहरचा मुलगा शहाअलम याच्या नांवें तक्तावर बसविला. शिंदे, होळकर व सुरजमल यांच्या मनांत गाजीउद्दिनला वजिरात द्यावी असें होतें, पण बळवंतराव मेहेंदळ्यांच्या सांगण्यावरून भाऊंनीं नारो शंकर याला राजे बहाद्दर ही पदवी व जिरातीचा हुद्दा दिला तेव्हां सुरजमल नाखूष झाला.

खर्चाला पैसा पाहिजे म्हणून तक्तावरचें रुप्याचें छत भाऊंनीं फाडलें. ही गोष्ट देखील सुरजमल याला आवडली नाहीं. फिरून दिल्ली सोडून पुढें जाण्याचा प्रश्न निघाला तेव्हां सुरजमल यानें त्याविषयींहि नापसंति

दाखविली व कुंजपुरास जावयाचेंच तर जाऊन ताबडतोब दिल्लीला परत यावें, कारण दिल्लीस मला हवी तितकी रसद तुम्हांला पोंचविता येईल असें सांगितलें. परंतु भाऊनें तेंहि ऐकलें नाहीं. तेव्हां शिंदे होळकरांच्या काण्या डोळ्याची परवानगी घेऊन तो रामगडास निघून गेला. त्यावर रागावून भाऊनें त्याचें बाजारबुणगें सांपडलें तें लुटविलें. या वेळीं यमुनेस पाणी भारी. दुराणी तर यमुनेपार राहिला. म्हणून सध्यां कुंजपुरा घ्यावा असें भाऊनें ठरविलें; कुंजपुऱ्यास वेढा देऊन तें ठाणें घेतलें व लुटलें. पैसा व लष्करी सरंजाम मिळाला. कुतुबशहा व सामतखान यांना जिवें मारलें. व दत्ताजी शिंद्याचा सूड भाऊनें घेतला. कुतुबशहा म्हणत होता कीं, मला वांचवाल तर मी रोहिले यांचा तुमचा तह करून देईन. पण भाऊनें तें मानलें नाहीं. होळकर व शिंदे म्हणत होते कीं त्याला वांचवून कार्य साधावें. कुंजपुरा घेतल्याचा भाऊला आनंद झाला, व तो घेण्याची सल्ला सुचविल्याबद्दल बळवंतराव मेहेंदळे यांनीं धन्यता मानली. मग शिंदे होळकर म्हणाले कीं अजून तरी दिल्लीला जाऊन पोहोंचूं या. तेव्हांहि मेहेंदळ्यानें त्यांना भित्रे ठरवून बोल लाविला. तेव्हां मल्हाररावहि उलट टाकून बोलला. बखरकार म्हणतो ते समयीं दिल्लीस प्रविष्ट होते तर अवघड न पडतें. कुंजपुऱ्यास खणत्या लावून स्वस्थ राहिले. तीच वेळ अबदालीनें साधली व एकदम साठ कोस मजल मारून पाणिपत कर्णोळ येथें यमुना उतरून फौजेसह तो अलीकडे आला, तें भाऊला वेळींच कळलें नाहीं. जवळच्या ठाण्यांतील शिपाई उठोन भाऊकडे गेले तेव्हां कळलें. भाऊंनीं विचार केला कीं दुराणी एकाएकींच यमुना उतरून अलीकडे आला तस्मात् त्याचा जोर भारी तेव्हां उमेदीनें आला; तेव्हां काय करावें? तेव्हां कांहींनीं जुन्या रागावर कानावर हात ठेवले पण कांहीं म्हणाले दिल्लीला पोंचावें म्हणजे बचाव होईल. पण इब्राहिमखान गारदी म्हणाला कीं सैन्याचा गोल बांधून चालला तर तुमची निभावणी करून देईन. गनिमी कावा केला तर मग आमचा यत्न राहिला. तेव्हां भाऊनें तीच मसलत स्वीकारिली. म्हणजे सर्व सैन्य व तोफखाना घेऊन हलक्या मजलीनें दिल्लीकडे चाललें. नंतर पहिली चकमक बाजी हरि, भगवंतराव कदम, येसूजी भोइटे, यांना टेहेळणीस पाठविलें, त्यांची व दुराणी फौजेची झाली. त्यांत मराठ्यांचे बाराशें स्वार मेले. बखरकार

म्हणतो हें वर्तमान फौजेंत कळतांच छबी मावळली. हिंमत दिल्लीस जावयाची होती ते राहिली. मग पानपत नजीक म्हणोन तेथें खंदक खणून तळ दिला. दक्षिणेंत तीन कोसांवर शत्रूची एक लक्ष वीस हजार फौज व तीनशें तोफा अशी होती तरी त्यांनाहि मराठ्यांची धास्ती वाटे, म्हणून त्यांनीं एकाएकीं लढाईशीं गांठ घातली नाहीं पण मराठे मात्र भिऊन जाऊन आखडून राहिले. व दुराणी कावे देत त्यांच्या भोंवतीं फिरूं लागला. असे महिना पंधरा दिवस गेले. सर्व प्रकारची महागाई झाली. निभावणी कठिण म्हणून विश्वासरावानें कुमक पाठविण्याकरितां नानासाहेबाला पत्र पाठविलें. पण भाऊनें रागावून त्याचा निषेध केला. दिवसेंदिवस मराठे जेरीस येत चालले आणि शत्रू भर घेत चालला. गोविंदपन्त बुंदेल्यानें कसे तरी वीस लक्ष रुपये दिल्लीस आणले, पण भाऊकडे लष्करांत पोंचण्याची अडचण. भाऊंनीं अबदालीची रसद मारावी म्हणून गोविंदपंत व पाराजीपंत यांना यमुनेपलीकडे अन्तर्वेदींत पाठविलें. त्याची व दुन्देखान रोहिला व लंगडा अहमदखानाचा भाऊ यांची लढाई झाली. शत्रूंनीं होळकरांचें निशाण दाखविल्यानें मराठे फसले व पराभव पावले. बुंदेल्याचा शिरच्छेद झाला. असा दुहेरी डाव फसलेला पाहून भाऊ निकरावर आला. भरींत भर दुर्दैवाची पडली, ती अशी कीं, बुंदेले याचा मुलगा व पाराजीपंत दिल्लीहून खजिना घेऊन पानिपतास निघाले तेहि चुकून शत्रूच्याच तळावर जाऊन लुटले गेले. मग बळवंतराव मेहेंदळे याची शिंदे होळकरांशीं कुरबुर व तोंडातोंडी होऊन बळवंतराव शत्रूवर हल्ला करण्यास गेला, पण शिंदे होळकरांच्या फौजेनें त्या लढाईंत पराक्रम फार केला व दिवस बुडला म्हणूनच शत्रु वांचला. फिरून पंधरा वीस दिवसांनीं कुरबुर होऊन आपण एकट्यानें हल्ला करून एकट्याला यश मिळवावें म्हणून बळवंतराव निघाला. शिंदे होळकर तटस्थ राहिले. पण बळवंतरावाचा पराभव झाला व तो मारला गेला. मग शिंदे होळकर पुढें निघाले व त्यांनीं शत्रूला मागें हटविलें.

बळवंतरावाची बायको सती गेली. या लढाईमुळें मराठ्यांनीं फार धास्ती घेतली, बाहेर कोणी निघेनासें झालें. तेव्हां दिल्लीची सरळ वाट सोडून पांच कोसांवर यमुनेच्या तीरीं जाऊन नदी पाठीशीं घेऊन तोफखाना तोंडावर ठेवून लढावें. होळकरांना ही मसलत पसंत पडली नाहीं. गनिमी काव्याचा

सल्ला पटेना व इब्राहिमखानाला सोडून देऊन भाऊला एकटेंच दिल्लीकडे जाववेना. शेवटीं ठरलें कीं, गोल बांधून मध्यें बुणगें घालावें. भोंवतालीं आराबा वाटून द्यावा, व सरदारांना चारी बाजू वाटून द्याव्या आणि कोस दोन कोस लढत भांडत दिल्लीला जाऊन पोहोंचावें. पण तो बेत सिद्धीस गेला नाहीं.

आतां याच साडेपांच महिन्यांतील प्रसंगाची हकीकत काशीराज पंडितानें जितकी दिली आहे, तितकी येथें देतों. म्हणजे ही बखर व ती बखर यांच्या हकीकतींची तुलना लक्षांत येईल.

'भाऊसाहेबांची कैफियत' या नांवाची आणखी एक बखर आहे. तिच्यांतील कथासूत्र पानपतच्या बखरीसारखेंच आहे. तथापि ज्या थोड्या बाबतींत या दोन बखरींत अधिकउणेपणा दिसून येतो तितक्याच येथें नमूद करतों. वळवंतराव मेहेंदळे यानें दिल्ली शहर घेतलें पण किल्ला घेववला नाहीं. बळवंतरावानें फक्त मोर्चे बसवून दोन कोस मागें परतून तळ दिला ती गोष्ट भाऊसाहेबांना आवडली नाहीं. तेव्हां ते आठ दिवसांच्या आंत स्वतः दिल्लीस गेले. व मग किल्ला सर झाला. सुरजमल जाट याचें म्हणणें दिल्ली आपले स्वाधीन करावी. ती केली नाहीं म्हणून तो आपल्या राजधानीला गेला. दिल्लीस असतांच खर्चाची निकड म्हणून बादशाही तक्ताखालीं रुप्याच्या कांबीवर पेटचा किल्ल्या बसविल्या होत्या, त्या काढून सात लक्ष रुपयांचें नाणें पाडलें. हा बखरकार छत फोडल्याचें लिहीत नाहीं. आश्वीन शुद्ध प्रतिपदेला भाऊसाहेब कुंजपुऱ्याकडे निघाले. दशमीस कुंजपुऱ्यापासून अलीकडे दीड कोस तळ पडला ही हल्ल्याची बातमी अबदाल्लीला कळून त्यानें एक दिवस दम धरा, मी मदतीला येतों असें किल्लेदार कुतुबशहा याला कळविलें. ही बातमी भाऊसाहेबाला कळल्यानें जलदी करून तोफा मारून ठाणें घेतलें. दहा पंधरा लक्षांचा ऐवज मिळाला. कुंजपुऱ्यानजीक यमुनेपलीकडे अबदालीची कुमकेची फौज आली होती. पण मग ती परत गेली. आश्वीन शु.।। १५ पर्यंत कुंजपुऱ्यास मुक्काम होता. आश्वीन व.।। १ स पुढें कुरुक्षेत्राकडे तीर्थयात्रेला जाऊन यावें म्हणून निघाले. परत येऊन नदीचें पाणी उतरल्यावर यमुना उतरून शत्रूशीं गांठ घालावी असा भाऊचा बेत. पण इतक्यांत अबदाल्लीला यमुनेनें वाट दिली. व त्याची

फौज अलीकडे आली. हें कळतांच द्वितीयेचे दिवशीं बारा कोस, तृतीयेचे दिवशीं सहा कोस अशी मजल मारून चतुर्थीचे दिवशीं पानिपतास दाखल झाले. तों गिलच्या सोनपतास आला व तेथील मराठ्यांचें ठाणें उठलें. कुंजपुऱ्याकडे जातांना गिलच्याला नदी उतरतां येऊं नये म्हणून भाऊंनीं सेलिमगडाजवळ दीडशें नावा अटकावून ठेवल्या होत्या. पण उतार मिळाल्यामुळें अबदालीचें फावलें. पानिपतास जुना खंदक होता त्याजवळ बुणगें ठेविलें. कार्तिक शुद्ध प्रतिपदेपासून लढाईला प्रारंभ झाला.

प्रथम मराठ्यांच्या लष्करांत बारा शेर धान्य मिळत होतें. अबदालीच्या लष्करांत चार शेरच मिळे. तेव्हां अंतर्वेदींतून रसद आणवून महागाई दूर करावी म्हणून गिलच्यानें मुक्काम हटवून यमुनातीरीं तळ दिला. नंतर युद्धाचा निकाल लागत नाहीं असें पाहून दोन्ही सैन्यांतील झाडी तोडून मैदान करून रणखांब पुरून एकमेकांना युद्धाचीं आव्हानें सुरू झालीं, असें बखरकार लिहितो. पण ती केवळ कल्पना दिसते. मध्यंतरीं बऱ्याच चकमकी झाल्या. रोहिल्यांचा एक मोठा पराभव झाल्यावर नबीबखानानें अबदालीकडे जाऊन तक्रार केली. सुजाउद्दौला याजकडून तहाच्या बोलण्याकरितां अबदालीच्या विचारें वकील पाठविला. पण नजीबउद्दौला त्यांत सामील नव्हता. अबदालीनें अटकेपर्यंत मुलूख घ्यावा व दिल्लीचा बंदोबस्त मराठ्यांनीं करावा अशा अटी अबदालीनें सुचविल्या. पण नजीबखानाला आमच्या हातीं द्यावा अशी अट भाऊंनीं घातली म्हणून तह झाला नाहीं. नंतर भाऊंनीं गोविंदपंत बुंदेल्याला अबदालीची रसद बंद करण्याचा हुकूम पाठविला; त्याजवर लंगडा पठाण चालून आला. इकडून नारो शंकर वगैरे लोक गोविंदरावाच्या मदतीला पाठविले, पण ते पोंचण्याचे आंत गोविंदपंताचा पराभव होऊन तो मारला गेला. धान्याचा पुरवठा मिळविण्याकरितां कुरुक्षेत्राकडील लमाण लोकांशीं बोलणें केलें. पण उपयोग झाला नाहीं. रुपयास १ शेर धारण झाली तेव्हां पुण्यास मदत मागण्याकरितां व सल्ला घेण्याकरितां पत्रें गेलीं. विश्वासरावानें नानासाहेबाला लिहिलें कीं तुम्हाला माझ्यासारखे मुलगे होतील पण भाऊसारखा भाऊ मिळणार नाहीं तरी सत्वर यावें. मग भाऊंनीं दिल्लीचा मार्ग सोडून दुसरीकडे निघून जाण्याचा विचार केला. यमुना पाठीशीं घेऊन गिलच्याचे तोंडावर तोफ-

खाना देऊन दिल्ली उजवे बाजूस घालून पुढें जाऊन यमुनातीरीं मुक्काम करावा असा भाऊचा बेत परंतु पौष शु.॥ ८ रोजीं तोंड लागून पानपतचें युद्ध झालें.

तिसरी 'काशीराजाची बखर' काशीराज पंडित याची. त्यांतील थोडी हकीकत या प्रसंगापुरती देतों. भाऊ दिल्लीस होते तेव्हां दुराणी अनुपशहर येथें छावणीस राहिला. तेथें सुजाउद्दौला आपल्या बाजूस आणण्याचे प्रयत्न झाले. त्याकरितां अबदालीनें खुद्द नजीबउद्दौल्यास पाठविलें. नजीबानें सांगितलें कीं पेशवे हे कुल मुसलमानांचे शत्रु आहेत. त्यांशीं तह करूं नये, तीन दिवसांनीं सुजाउद्दौल्यानें अखेर निश्चय केला कीं, दोहोंपक्षी संकटच. तथापि एकंदर विचार करितां अबदालीला मिळावें हेंच बरें. व तो अनुपशहर येथें येऊन अबदालीला मिळाला. पावसाळा सुरू होता. तरी अबदाली अनुपशहराहून निघून दिल्लीसमोर यमुनेच्या उत्तर तीरीं शहराजवळ राहिला. दोन्ही सैन्यें एकमेकांना दिसत होतीं. भाऊनें भवानीशंकर पंडित नांवाच्या वकिलाला सुजाकडे तहाकरितां वकील पाठविला. उलट सुजानें राजा देवीदत्त नांवाच्या चतुर उमरावाला भवानीशंकरबरोबर भाऊकडे पाठविला. त्याबरोबर काशीराजा यालाहि पाठविलें, हें कळतांच भाऊनें खुद्द काशीराजाला स्वतः पत्र पाठविलें. याच वेळीं मल्हारराव व सुरजमल यांजकडील तहाचीं बोलणीं अंतस्थ येत होतीं. तीं सुजा नजीबखानाला कळवी. व त्यांच्या सल्ल्यांनीं मराठ्यांशीं तहाचीं बोलणीं बोले. सुजानें आंतून सुरजमल याला मराठ्यांची बाजू सोडून देण्यास सुचविलें व त्याप्रमाणें तो गेला. भाऊनें सुजाला कळविलें कीं, अटकेपारचा मुलूख अबदालीनें घ्यावा. फार तर लाहोरपर्यंत घ्यावा. फार तर सरहिंदपर्यंत घ्यावा. पण अलीकडील मुलुखांत किंवा कारभारांत ढवळाढवळ करूं नये. पण उभय पक्षांच्याहि मनांत तह करण्याची तितकी निकड नव्हती म्हणून झाला नाहीं. मग पावसाळा संपत आला असें पाहून भाऊ कुंजपुऱ्याकडे गेला. हेतु हा कीं, कुंजपुरा घेऊन नदी उतरून अंतर्वेदींत जाऊन अबदालीशीं गांठ घालावी. दसऱ्यापूर्वीं अबदालीनें लष्कराची मोजदाद केली. त्याजकडे बाराशें स्वारांचें एक अशीं चोवीस पथकें होतीं. दोन हजार उन्ट, चाळीस तोफा व जंबुरे व सुतरनाळ पुष्कळच. सुजाउद्दौल्याजवळ दोन हजार स्वार, दोन हजार

पायदळ व वीस तोफा. नजीबउदौल्याजवळ सहा हजार स्वार व वीस हजार रोहिल्यांचें पायदळ व तिरंदाज. दुन्देखान व हाफीज रहिमत याजवळ पंधरा हजार रोहिले व चार स्वार व कांहीं तोफा होत्या. अहमदखान बंगषजवळ एक हजार स्वार, एक हजार पायदळ व कांहीं तोफा होत्या. मिळून एकंदर ४१,८०० स्वार, ३८,००० पायदळ, व सत्तर ऐंशी तोफा असा सरंजाम होता. काशीराज पंडित म्हणतो कीं, ही माहिती अगदीं पक्की आहे. कारण ती कागदपत्रावरूनच तयार केली आहे. सैन्याची गणती केल्यावर दोन दिवसांनीं अबदालीनें कूच केलें. मराठ्यांकडे एकंदर फौज ५५,००० घोडेस्वार, १५,००० पायदळ, व त्यांतच इब्राहिमखानाची फौज होती व तोफा सुमारें २०० होत्या. दोन्ही सैन्यांकडे पेंढारवजा सैन्य बरेंच होतें. दिल्लीस मराठ्यांचें सैन्य होतें तें वेगळें. दसऱ्यानंतर दोन दिवसांनीं अहमदशहानें तळ हलविला व दुसरे दिवशीं बागपत येथें म्हणजे दिल्लीच्या उत्तरेस अठरा कोसांवर मुक्काम केला. येथें अबदालीनें अनेक धर्मकृत्यें केलीं. तेव्हां तिसरे दिवशीं त्याला नदींतून उतार मिळाला. मात्र तो निरुंद असून पाणी खोल होतें. दोन दिवसांत सर्व सैन्य नदीपार झालें. (२५ आक्टोबर) २६ आक्टोबर रोजीं भाळकियाच्या सराईजवळ उभय सैन्यांची आघाडी एकमेकांना भेटली. त्या चकमकींत मराठे थोडे मागें हटले. रोज थोडथोडा अबदाली पुढें येई व मराठे मागें हटत. असें होतां होतां भाऊनें पानपताजवळ पक्की छावणी केली. तेथून अबदाली खालीं चार कोस होता. सैन्यांचा विस्तार तीन कोस होता. इटावा, शेकोबाद, कात्वी वगैरे (यमुनेपलीकडील) जिल्हे गोविंदपंताच्या ताब्यांत असल्यामुळें भाऊच्या हुकुमावरून पंतानें दहा बारा हजार फौज घेऊन अहमदशहाच्या पिछाडीस मिरतपर्यंत जाऊन रसद मारण्याचा उद्योग केला त्यामुळें शहाच्या छावणींत शेरभर पिठाला दोन रुपये पडूं लागले. तेव्हां शहाच्या हुकुमावरून बताई-खानानें मोठ्या सैन्यानिशीं दौड करून छापा घालून पराभव करून गोविंद-पंताचें डोकें कापून आणून शहाला नजर केलें. येथपासून शहाला रसद बिनबोभाट मिळूं लागली. नंतर भाऊनें दोन हजार फौज दिल्लीहून खजिना आणण्यास पाठविली ती खजिना घेऊन परत येतांना अखेरच्या कामांत चकून शहाच्या एका छावणींत येऊन लुटली गेली. यानंतर (?) २९ नोव्हें-

बर, २३ दिसेंबर या दिवशीं युद्धें झालीं. या दुसऱ्यांत बळवंतराव मेहेंदळे पडला. दुसरे बाजूस नजीबउदौल्याचा चुलता खलील उल् रहमान मारला गेला. तिसरीहि एक लढाई अशीच झाली ती सकाळपासून रात्रीं नऊ दहा-पर्यंत चालू होती. मग अबदालीचे हिंदुस्थानी सरदार कंटाळले व म्हणूं लागले कीं हा उंदीर मांजराचा खेळ पुरे. एकदांच काय तो निकाल लावावा. अबदाली म्हणाला तुम्ही स्वस्थ रहा जें करणें तें मी योग्य वेळीं करीन. त्यानें मराठ्यांची रसद मारण्याचा सक्त उद्योग केला. तेव्हां धान्य व वैरण हीं अगदीं तुटलीं. एके रात्रीं मराठ्यांचे वीस हजार लोक लांकूडफांटा आणण्याकरितां जंगलांत गेले, त्यांना शहा पसदखान यानें वेढा देऊन कापून काढलें. प्रेतांचे ढीग पाहून अबदालीलाहि नवल वाटलें. भाऊच्या मनांत भीति व निराशा उत्पन्न झाली. भाऊकडील गणेशपंडित हा सुजाचे छावणींत बातमीदार पेशव्याकडील होता त्यामार्फत भाऊचीं स्वदस्तुरचीं पत्रें मला आलीं कीं सुजाला सांगून तहाची खटपट मीं करावी. फक्त सैन्यासह सुरक्षित जाऊं दिलें म्हणजे बाकी सर्व अटी आपण मान्य करूं. एका पत्रा-बरोबर जबाबाकरितां उंची वस्त्रें, जवाहीर व मूठभर केशर (बेलभंडार) पाठविलें. नबाबानेंहि उलट देणग्या पाठविल्या. सुजानें मला वजिराकडे पाठविलें. त्याचेंहि म्हणणें तह व्हावा व तो अबदालीला तसें म्हणाला. त्यावर अबदाली म्हणाला, तुम्हीं रोहिले वगैरे माझ्या देशबंधूंनीं व इतर मुसलमानांनीं आपणाला मराठ्यांचे हातून सोडविण्याकरितां मला बोलाविलें तेव्हां लढण्याचें काम माझें. तें मी हवें तसें करणार. तह तुमचे तुम्ही हवे तसे करून घ्या. हफीज रहमतखान, दुन्देखान, अहंमदखान वगैरे हेहि तह करावा म्हणत. पण प्रत्येक जण म्हणे कीं नजीबखान तह करील तरच. मग सुजानें मला नजीबखानाकडे पाठविलें. खासगी बसून मीं तह का करावा यासंबंधानें सर्वांचें म्हणणें सांगितलें त्यावर नजीब म्हणाला, "सुजा हा ज्याला मी वरिष्ठ समजतों त्या सफ्दरजंगाचा मुलगा खरा पण तो बच्चा आहे. त्याला खोल बुद्धि नाहीं. अडचणींत सांपडल्यानें आज मराठे हव्या त्या अटी कबूल करतील. पण पुन्हा पहिली संधि मिळतांच तोंड फिरवतील. आज सर्व दक्षण आपल्या पावलाखालीं सांपडली आहे. तेव्हां एक झटका मारून आपल्या कुशींतला हा कांटा कायमच काढून टाकूं.

नवाबाला म्हणावें थोडा धीर धरा. मीच तुमच्या भेटीला येतों." या वेळीं मध्यरात्र झाली होती. नजीब तसाच उठला व अबदालीकडे गेला व म्हणाला, सगळे सरदार तह करावा म्हणतात, पण माझ्या मतें तो मुळींच करूं नये. मराठे मार्गांतून निघाले म्हणजे दिल्लीचें राज्य तुमचेंच आहे. म्हणाल तेव्हां घ्याल. मी काय नंग्या तलवारीचा शिलेदार जो जिंकील त्याचा उद्यां मित्र होईन. अबदाली म्हणाला, तुमच्या सारखेंच माझें मत आहे. सुजा पोर आहे. मराठे कपटी आहेत. प्रथमपासून सगळीं सूत्रें मीं तुमच्या हातीं दिलीं आहेत. तेव्हां सर्वांचें मी ऐकेन, पण तुमचें मन मोडणार नाहीं. दुसरे दिवशीं रात्रीं नजीब सुजाकडे जाऊन अपरात्रीपर्यंत ते बोलत बसले. पण निकाल लागला नाहीं. इकडे भाऊच्या लोकांनीं उपासमारीमुळें गिल्ला केला व सोक्षमोक्ष करून घेण्याचें ठरलें. बेत असा झाला कीं, छावणींतून पहाटे बाहेर पडावें, तोफखाना आघाडीला ठेवावा व लढत निघावें. सर्वांनीं शपथा घेतल्या, पानविडे झाले. या निकराच्या वेळीं भाऊनें मला स्वहस्तें चिठी लिहिली त्यांत मजकूर कीं "पेला कांठोकांठ भरला. एकहि थेंब आतां त्यांत मावत नाहीं. करणें असेल तर आतांच कांहीं करा. पुढें लिहिण्या-बोलण्याला वेळ उरणार नाहीं." मी पहाटे तीन वाजतां ही चिठी नबाबाला दाखविली व चिठी घेऊन येणाऱ्या माणसाला नबाबापुढें उभा केला. त्यानें सर्व हकीकत सांगितली. इतक्यांत नबाबाच्या हरकाऱ्यांनीं बातमी आणली कीं मराठ्यांची छावणी उठली. सैन्य बाहेर पडून तोफखाना आघाडीला घालून चालून येत आहे. लगेच नजीब उठून अबदालीच्या तंबूंत गेला व त्याला जागें करून ही बातमी सांगितली व म्हणाला 'आतां घोड्यावर स्वार व्हा. दुसरी गोष्ट नाहीं.' अबदालीनें कपडेहि बदलले नाहींत. तसाच घोड्यावर बसून फौजेला सांगत हिंडला. सुजानें माझें नांव अबदालीला सांगितलें तेव्हां मला सांडणीस्वार बोलावूं आला. मीं जाऊन सांगितलें कीं दिवस उजाडतांच मराठे चालून येतात इतक्यांत कांहीं दुराणी स्वार घोड्यावर लूट घालून तिकडून चालले ते म्हणाले, मराठे पळ काढीत आहेत. अबदाली म्हणाला, तुम्ही सांगतां मराठे चालून येतात हे म्हणतात मराठे पळ काढतात हें कसें? मी म्हणालों, किंचित् उजाडलें कीं आपोआपच कळेल; पण हें बोलतों इतक्यांत मराठ्यांचा तोफखाना पुढें आला होता त्यानें पहिली सरबत्ती केली!

---

## लेख बाविसावा

# इतिहास हें शास्त्र कीं कला ?

[ पुणें येथील भारत इतिहास संशोधक मंडळाच्या चोविसाव्या वाढदिवस-समारंभाच्या प्रसंगीं ता. १४ जुलै १९३४ रोजीं केलेलें भाषण. ]

इतिहासाच्या उपयोगाच्या दृष्टीनें नेहमींच मतभेदाला जागा असते. तथापि दुरुपयोग होतो असें म्हटलें तरी संशोधन फुकट जात नाहीं. या बाबतींत ययाती आणि पुरु यांचा दाखला घेतां येईल. ययातीनें पुरूपासून तारुण्य घेतलें व पुरूला जुनें ऐश्वर्य प्राप्त झालें. त्याचप्रमाणें नव्या पिढींतील लोकांना जुन्या पिढीच्या अभ्यासापासून एक प्रकारें ऐश्वर्य प्राप्त होतें व आपण जुनेच आहोंत असें वाटूं लागतें; व जुन्या इतिहासाला तारुण्य प्राप्त होतें तेव्हां जुना इतिहास हा ययातीप्रमाणें असून नव्या पिढीची पुरूशीं तुलना करतां येईल. इतिहासज्ञानाचा उपयोग कसा करावा यासंबंधीं किंचित् दुमत होण्याचा संभव आहे. मी आजच्या माझ्या प्रतिपादनांत अनृत अगर अतिशयोक्तीचा दोष येऊं देणार नाहीं; तसेंच श्री. शेजवलकर यांच्या म्हणण्याची विकृतीहि होऊं देणार नाहीं. आधुनिक जगाला इतिहासाचा शास्त्र या दृष्टीनें व्हावा तितका उपयोग होत नाहीं. इतिहासाचा कला या दृष्टीनें मात्र बराच उपयोग होतो; इतिहासज्ञानाचा उपयोग कलेच्या दृष्टीनेंच होईल व त्या दृष्टीनें त्याची उपासना केली पाहिजे असें माझें मत आहे. आतां आपण शास्त्र व कला म्हणजे काय तें पाहूं. शास्त्र म्हणजे ज्ञानाचा संग्रह; या ज्ञानसंग्रहावरून नंतर आडाखे बसविण्यांत येतात. शास्त्र हें नेहमीं विचारप्रधान असतें. तर कला आचारात्मक आहे. कलेला शास्त्रांतील ज्ञानाचा उपयोग करण्याची मुभा आहे. शास्त्राचा तसा उपयोग कलेला करतां आला नाहीं तर नुसत्या शास्त्राचें काय लोणचें घालून ठेवावयाचें आहे ? तथापि कलेच्या उपासनेंत आपण नीतीचे ढोबळ नियम पाळले पाहिजेत. कलोपासनेच्या नांवाखालीं असत्य व अनीतिकारक तत्त्वांस वाव मिळतां कामा नये. आतां आपण (१) इतिहास म्हणजे काय व त्यांतील सत्य काय तें पाहूं. (२) तसेंच तें ऐतिहासिक सत्य चांगलें किंवा

वाईट असा निर्णय देण्याचा आपणाला अधिकार आहे किंवा नाहीं. व (३) शहाणपणानें त्याचा उपयोग करावयाचा कीं नाहीं? यांपैकीं शेवटचा मुद्दा नीतीच्या सदरांत येतो व कलोपासकाला कांहीं स्वातंत्र्य ठेवावें लागतें. अर्थात् ढोबळ नियम त्यानें पाळलेच पाहिजेत. दुर्मिळता हा इतिहासाचा मौल्यवान व महत्त्वाचा अलंकार आहे; अमुक अमुक झालें असें आपण म्हणतों. तथापि भूतकालवाचक तें सर्वच इतिहास नव्हे. तसेंच कादंबरी, काव्य व महाकाव्यहि इतिहास नव्हे.

मनुष्यप्राण्यानें केलेली जी गोष्ट तो इतिहास अशी इतिहासाची व्याख्या करितां येईल. अर्थातच पुराणें, कल्पित कादंबऱ्या, भूकंप वगैरे निसर्गेतिहास वगैरे विषय इतिहासांतून वगळले जातात. मनुष्यानें केलेल्या गोष्टींचें सत्यकथन तो इतिहास. सत्यकथन असें आपण चटकन बोलून गेलों. परंतु मोठा खड्डा तेथेंच आहे. शास्त्र सत्यनिर्णयांत आहे व सत्य गोष्ट ठरविण्याकरितां शास्त्राचा आपण जितका करून उपयोग करूं तितका कमीच होणार आहे. परंतु त्याच्या मर्यादा पाहणें अधिक बोधप्रद असतें. एकादी गोष्ट घडली कशावरून ? ती खरी कीं खोटी ? असे प्रश्न उपस्थित होतात. रॅलेला प्रत्यक्ष पाहिलेल्या गोष्टींसंबंधानें निर्णय देतां येईना; तेव्हां त्यानें आपलें इतिहासाचें चोपडें जाळून टाकलें. स्वतः पाहिलेल्या गोष्टीचा जेथें निर्णय देतां येत नाहीं ती बाकीच्यांनीं सत्य काय मानावी ? याचा अर्थ आपण सत्य हुडकूं नये असें नाहीं. ज्याला आपण ऐतिहासिक सत्य म्हणतों तें मर्यादित व संशयित असतें. आतां एकादी गोष्ट ऐतिहासिक सत्य आहे हें ठरल्यावर ती गोष्ट बरी आहे कीं वाईट आहे हा दुसरा प्रश्न उपस्थित होतो. त्या गोष्टीसंबंधानें आपण कांहीं निर्णय ठरविला नाहीं, त्यासंबंधीं निर्णय दिला नाहीं तर त्या ऐतिहासिक सत्याचा उपयोग काय ? तसेंच त्या वेळची परिस्थिति लक्षांत घेऊनच आपण जज्मेंट द्यायला हवें, त्या गोष्टीला पूर्वीच्या काळांत नेणें अगर अलीकडे ओढणें योग्य होणार नाहीं, या प्रश्नावर जेवढें दुमत होतें तेवढें कोठेंहि होत नाहीं. मग जज्मेंट द्यावें कीं नाहीं ? मी या मताचा आहे कीं, जज्मेंट दिलेंच पाहिजे. वासुदेवशास्त्री खरे म्हणतात कीं, खऱ्याखोटयाचा निर्णय ठरवीत बसणें फारसें बरें नव्हे. श्री. शेजवलकर म्हणतात कीं, तसा निर्णय लावणें आवश्यक आहे व माझेंहि मत

श्री. शेजवलकर यांच्या मताप्रमाणेंच आहे. परंतु दुमत कां होतें त्याचीं कारणें आपण शोधलीं पाहिजेत.

श्री. सरदेसाई यांचें बाळाजी बाजीरावाचें चरित्र व त्याला श्री. शेजवलकर यांनीं लिहिलेली प्रस्तावना हेंच उदाहरणादाखल घेऊं. श्री. सरदेसाई यांच्या मतें शिवाजीनंतर एकच खरा मुत्सद्दी झाला. व तो म्हणजे बाळाजी बाजीराव हा होय. तथापि त्याच्या अगदीं उलट मत श्री. शेजवलकर यांनीं प्रस्तावनेंत दिलें आहे. आतां खरें कोणाला मानावें ? या संबंधांत खऱ्यांची गर्भित सूचना अशी होती कीं, निर्णय देतांना फार सावधगिरी बाळगली पाहिजे; पुष्कळ वेळां आपला जज्जाचा आविर्भाव चुकीचा असतो. या वेळीं एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे व ती म्हणजे या परिस्थितींत मीं स्वतः काय केलें असतें ? ही होय. या प्रश्नाचें जें उत्तर येईल तें भीत भीत सावधगिरीनें संशय प्रकट करीत सूचित केलें पाहिजे. पोर्तुगीज लेखकांनीं शहाजीच शिवाजीचा बाप कशावरून ? या उपस्थित केलेल्या वादाचें, सत्याबद्दलहि दुमत कसें असूं शकतें याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणून देतां येईल. आतां तिसरा प्रश्न Wisdom हा होय. घडलें तेंच व अगदीं तसेंच आपण करावें काय ? आपण वाईट करीत नाहींच; म्हणजे निम्मा भाग गेला. हा तिसरा प्रश्न पूर्वीच्या दोन प्रश्नांइतकाच वादग्रस्त आहे. श्री. शेजवलकर यांचा व माझा मतभेद येथेंच आहे. " बाळाजीनें अनेक शत्रु केले " ही गोष्ट वाईट झाली असें श्री. शेजवलकर हे म्हणतात. आपण जर्मनीचें उदाहरण घेऊं. एकाच वेळीं जर्मनीनें अनेक राष्ट्रांशीं दोन हात केले, त्यासंबंधानें बोलतांना आपण म्हणतों कीं, "Germany was fighting on all fronts" अनेक प्रतिस्पर्धी होते, त्यांच्याशीं एकाच वेळीं दोन हात केले; तें बरें कीं वाईट हें कोण सांगूं शकेल ? बरें वाईट म्हणणें किती अवघड आहे हें यावरून आपणाला दिसून येईल. तसेंच श्री. शेजवलकर म्हणतात कीं, बाळाजीनें टिकाऊ राज्य केलें नाहीं ? हा निष्कर्ष लावला तर कोण टिकेल तेंच कळत नाहीं. बळवान असेल तो एकाच वेळीं अनेकांशीं टक्कर देऊं शकेल. या बाबतींत उलटसुलट बोलतां येतें. एकादी गोष्ट बरी म्हटल्याशिवाय आपण आचरणांत कशी आणणार ? याकरितां इतिहास आचरणांत आणतांना काय अडचणी येतात तें आपण पाहिलें पाहिजे.

## ऐतिहासिक सत्य म्हणजे काय ?

इतिहासाची आपण इंग्रजींत व्याख्या पाहिली असतां ती " Conformity with reality, with belief and surroundings " अशी सांपडते. सत्याचे तीन प्रकार आहेत. (१) अबाधित अंतिम सत्य; (२) दर्शन, आभास सत्य; हें सत्य उपाधिबाधित सत्य; व (३) व्यावहारिक सत्य; वासनामिश्रित सत्य. सत्याचा हा तिसरा प्रकार मोठा कठिण आहे. याला Interpretation नें तयार केलेलें सत्य म्हणतां येईल; आपणाला हवें तें सत्य भासविणें; मोठमोठे तत्त्वज्ञ एकत्र बसविले तरी त्यांजकडून सत्यनिर्णय होणार नाहीं; ज्याच्या त्याच्या बुद्धीप्रमाणें मतभेद होईलच. म्हणून सत्य सोडून देतां येणार नाहीं. दुसरें सत्य समजुतीचें सत्य आहे; गोठ्यांत बैल आहेत कीं गेले असा दोन मुलांत मतभेद झाला. एकानें आपल्या समजुतीप्रमाणें उत्तर दिलें व दुसऱ्यानें त्याविरुद्ध उत्तर दिलें. तेव्हां या प्रश्नाचा निर्णय देतांना त्या मुलांच्या बापानें समजुतीप्रमाणें ज्यानें सांगितलें तें खरें असा निर्णय दिला. वस्तुस्थिति कांहीं असो, स्वतःची समजूत यालाच यांत प्राधान्य मिळतें. तिसऱ्या सत्यांत राष्ट्राचा अभिमान शिरतो. इतिहासांत एकादी वाईट गोष्ट दिसली व ती आपणाला चांगली दाखवावयाची असली तर आपण तिचा खुलासा करतों.

'शिवाजीला अनेक बायका होत्या' हें ऐतिहासिक सत्य आहे. याबद्दल परराष्ट्रीयांनीं नांवें ठेवल्यास नांव ठेवण्यास जागा उरूं नये म्हणून त्या परिस्थितींत शिवाजीनें केलें तेंच योग्य असें समर्थन करून आपण भांडण त्याच्या अंगावर टाकतों इतका विकृत प्रयत्नहि देशाभिमानाकरितां करणें योग्य ठरेल. अशा वेळीं राष्ट्रीयत्व त्यांत आणणें फारसें चुकेल असें मला वाटत नाहीं. या प्रकारच्या व्यावहारिक सत्याला इतिहासांतच मागणी आहे असें नाहीं.

परकीयांच्या तोंडावर फेंकायला वाटेल तें करावें परंतु आपापसांत तसें करूं नये. दुष्ट लोक तुमची मानखंडना करण्याकरितां टपले असतांना व्यावहारिक असत्याला, असत्यमिश्रित सत्याला तेवढें स्वातंत्र्य देण्यास हरकत नाहीं. मुंबईंतील संप अमक्या तारखेस झाला अगर अमक्या दिवशीं पाणी गोठलें असें वर्तमानपत्रांत लिहिलें असलें तरी या प्रत्यक्ष परिणामाची क्रिया

होत होती असें आपण समजतों. वर्तमानपत्रांतील लिखाण तारतम्यानें घेतलें पाहिजे. एकाद्या ठिकाणीं हजारों लोक जमले होते असें एकादा बातमीदार लिहितो तेव्हां त्याला काय दर्शवावयाचें आहे इकडे आपण लक्ष दिलें पाहिजे. अशा वेळीं शास्त्र चुकलें असें म्हणतां येणार नाहीं. ऐतिहासिक शास्त्राचा कलेच्या दृष्टीनें उपयोग करावयाचा झाल्यास एवढें स्वातंत्र्य (Latitude) द्यावें लागतें. त्या वेळीं त्यानें सत्य झुगारून दिलें असा आपणाला आरोप करतां येणार नाहीं. तथापि सर्रास खोटें बोलावें असा याचा अर्थ होत नाहीं. " मराठ्यांनीं राज्य वाढविण्याचा फारसा प्रयत्न केला नाहीं " असें हे म्हणतात परंतु या बाबतींत त्यांचा माझा मतभेद आहे. मराठ्यांना तें साधलें नाहीं म्हणून वरील प्रकारचें विधान करणें बरोबर होणार नाहीं. माझ्या पुस्तकांत मी शिवाजीपासून स्वराज्य स्थापन करण्याची दूरदृष्टि मराठ्यांत होती असें म्हटलें आहे. शिवाजीनें औरंगजेबाची जहागिरी पत्करिली व त्याला मुजरा केला, यावरून स्वातंत्र्याच्या ध्येयवादासंबंधीं पोकळ गप्पा मारणारे लोक शिवाजीची किंमत रुपयांत १२ आणे करतील. पण तसें करून चालणार नाहीं. कांहीं म्हणतात इतिहासज्ञ निःपक्षपाती असला पाहिजे. परंतु तसें त्यानें केलें नाहीं तर त्याला तुम्ही पक्षपाती म्हणूं शकणार नाहीं. आतां आपण इतिहासांतील दाखल्याप्रमाणें आचरण करावें किंवा काय या Wisdom च्या सदरांत शिरूं. या ठिकाणीं जी गोष्ट सत्य व निर्विवाद आहे अशाच गोष्टींचा आपण विचार करणार आहों. इतिहासांत जो दाखला पाहिला तोच आपण गिरवावा काय ? या ठिकाणीं माणसाला पूर्वीच्याइतकीच किंबहुना अधिक स्वतंत्रता या प्रश्नांत मिळते असें मी म्हणतों. पूर्वीच्या इतिहासाला मोडून वागलें तरी चालेल असेंहि मी म्हणेन. इतिहासांतील अमुक एका दाखल्याला धरून चालावें असें म्हटलें तर कोणत्या कालांतील दाखला अनुकरणीय व कोणता अननुकरणीय हें कोणीं ठरवायचें हा प्रश्न उद्‌भवतो.

रामराज्य व स्विस् डेमॉक्रसी यांपैकीं चांगलें कोणतें याचा निर्णय सांगा असें म्हटलें तर कोण सांगेल ? येथें मतभेद होईल. अनुकरण करण्याकरितां पूर्वीच्या काळांत यशस्वी ठरलेला नमुना घेऊन चालूं. श्री. शेजवलकरांचें म्हणणें असें कीं, नव्या जगानें जुन्या जगाचे दाखले गिरविले पाहिजेत. परंतु येथें

त्यांचा व माझा मतभेद आहे. इतिहासांतील नमुना निवडणें व तो आचरणांत आणणें हा प्रत्येकाचा अधिकार आहे, व तें इतिहासशास्त्राला सोडून नाहीं. Wisdom याचा अर्थ जुन्या दाखल्याला धरून तें झालें पाहिजे असा करून चालणार नाहीं. कारण (१) एक तर जुना दाखला तंतोतंत मिळत नाहीं. व (२) मिळाल्यास तो तंतोतंत आचरणांत आणतां येत नाहीं; वरें तसा दाखला असूनहि (३) स्वतंत्र बुद्धीनें नव्या परिस्थितीप्रमाणें नवा नमुना एकाद्यानें म्हटल्यास त्याचें wisdom चुकलें असें कसें म्हणतां येईल ? त्यामुळें शास्त्राला बाध येत नाहीं. जुनें तें सत्य व चांगलें असलें तरी तें पाळलेंच पाहिजे असा आग्रह कोणाला धरतां येईल ?

(१) स्वीकार, (२) धिक्कार व (३) विकार; जुनें घेऊन नवें भरतीला घालणें असे याचे तीन प्रकार करतां येतील. परंतु त्यांपैकीं तिसरा प्रकारच अधिक प्रभावी असून त्यावरच जगाची प्रगति चालली आहे. यानंतर शास्त्राचें खरें रहस्य आपण ओळखलें व घेतलें असें म्हणतां येईल.

समाजशास्त्र पार बदलत चाललें आहे. त्यासोबत परिस्थितीहि बदलली आहे. स्पर्शास्पर्श विचार आतां पूर्वींइतका तीव्र स्वरूपांत राहिलेला नाहीं. साठ वर्षें कोंकणांत राहणारा मनुष्य आपल्या मुलांकरितां चाळींत राहावयास गेल्यास तेथील राहणीला अनुसरून त्याला साठ वर्षें उराशीं बाळगलेला स्पर्शास्पर्शविचार बाजूला ठेवावा लागतो. हा बदललेल्या परिस्थितीचा महिमा आहे. परिस्थितियोग्य वागणें येवढें तत्त्वहि जर शास्त्रानें आपणाला शिकविलें नाहीं तर मग शास्त्र फुकट गेलें असेंच म्हणावें लागेल. याशिवाय जगांतील शक्ती ( World Forces ) सारख्या बदलत असतात. श्री. शेजवलकरांनीं चॅथॅम व नाना फडणीस यांची तुलना केली आहे. परंतु अशी तुलना करणेंच बरोबर नाहीं. सहचारी शक्ति जेथें प्रभावी ठरते तेथें जुने दाखले काय उपयोगी पडणार ? दहा माणसांच्या कुटुंबांत एकादी व्यक्ति वाईट निघाली तर सर्व कुटुंबाची धुळधाण उडते; मग सामाजिक परिस्थितींत किती दाखले उपयोगी पडतील ? चित्रशाळेंतील दया, क्षमा, शांतीसंबंधींचा दाखला आपल्या घरांत भिंतीला लावून ठेवला तर त्याचा किती उपयोग होईल ? परिस्थितीप्रमाणें पूर्वींच्या दाखल्याला मुरड घालून जें आपण करूं तेंच खरें प्रभावी ठरणार आहे. जुना दाखला

तंतोतंत मिळाला तर घ्यावा; पण तो तसा मिळत नाहीं. जुना दाखला तंतोतंत कधीं उपयोगी पडत नाहीं. त्यांतला फारच थोडा भाग उपयोगी पडूं शकतो. साप पायाजवळ सळसळत आला तर जुने लोक साप कसा मारीत असत याचा विचार करीत बसावयाचें काय ? कीं काठी घेऊन सांपडेल तसा त्याला झोडपायचा ? जुना दाखला इतका ढोबळ मिळतो कीं, त्याचा कांहींच उपयोग होत नाहीं. याशिवाय जुनें मानावें हें जसें योग्य तसें नवें निर्माण करावें हें कां मानूं नये ? जुना दाखला घेऊन शक्य तितकें आपलें समर्थन करणें हें शास्त्रार्थाचें मुख्य रहस्य आहे. याचा अर्थ जुनें टाकायचें असा नाहीं तर आपल्या मतांच्या समर्थनार्थ त्याचा योग्य तो उपयोग करून घ्यावा. न्या. मू. रानडे यांनीं बालविवाहासंबंधीं मत ठरवितांना हेंच केलें. तसेंच जुन्याप्रमाणें वागतांना हातून थोड्याफार प्रमाणावर Negligence व Rashness हे दोष घडणें शक्य आहे. व तें क्षम्य आहे असें माझें म्हणणें आहे; मजवर कोर्टाचा अपमान केल्याबद्दल दोन खटले झाले व श्री. शेजवलकर यांच्या पत्राची जामीन रक्कम जप्त झाली हे प्रसंग आपण उदाहरणादाखल घेऊं. या गोष्टी आम्हाला कळत नव्हत्या अशांतला भाग नाहीं. परंतु हें कसें होतें तें सांगतों. १९०८ सालीं टिळकांवर खटला होऊन, शिक्षा झाली. त्यासंबंधीं मी मराठ्यांत लेख लिहून बाहेर पडलों येवढ्यांत ना. शास्त्री व श्री. नटेश्वरराव द्रवीड मजकडे आले व म्हणाले कीं, तुम्ही तावातावांत कांहीं तरी लिहाल व मग भलतेंच होईल; तरी तुम्हीं काय लिहिलें आहे तें दाखवा. नंतर त्यांच्या आमच्या विचाराप्रमाणें मीं लिहिलें; तरीहि खटला झालाच ही तुमची आमची गोष्ट ! मग तुम्ही नाना फडणिसासंबंधानें निर्णय काय देणार ? निर्णय द्यावेत; परंतु त्या वेळीं विनयानें काय म्हणावयाचें तें म्हटलें पाहिजे. दैववाद हा सर्वांना मान्य आहे. कांहीं गोष्टी दैवानें घडतात त्याला आपण काय करणार ? शिवाय जुने दाखले मनुष्यस्वभावावर अवलंबून असतात. परंतु तेथेंच मी घाव घालतों ! मनुष्यस्वभाव कायम नाहीं. तो नेहमीं बदलता आहे. मग या परिस्थितींत जुने दाखले कितीसे उपयोगी पडणार ? मार्कट्वेननें एका मनुष्याजवळ दहा हजारांची

नोट दिली व बाजारांतून सामान आणावयास सांगितलें. परंतु बाजारांत चलनच नसल्यानें त्या इसमावर उपाशी मरण्याची पाळी आली.

मनुष्यस्वभावावर ठराविक सिद्धांताची ( Maxims ) मात्रा लागू पडत नाहीं. जीव आणि ब्रह्म हें एक आहे हें नुसतें कळून काय उपयोग ? त्याप्रमाणें आपल्या हातून आचार घडला पाहिजे; तेव्हां दाखला जुना परंतु कर्तृत्व नवें असें शास्त्र बनविलें पाहिजे. जुना दाखला निर्णायक ठरत नाहीं. वासना निर्णायक ठरतात. इतिहास हें शास्त्र आहे. जुने दाखले चांगले आहेत. परंतु ते तावून सुलाखून घेतले पाहिजेत.

— समाप्त —

